


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.









अनुक्रमणिका

वार्षिक वर्गणी ४-८ ट. ह. सह

फुटकळ अंकास १ रु.

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष २ रें.] विजयादशमी शके १८५१ [अंक ३ रा.

सह वीर्यं करवावहै। तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका



आक्टोबर १९२९

## कार्यकारी मंडळाची सभा

(ता. १८ आगष्ट १९२९)

हजर— १ ना. गो. चापेकर, २ न. र. फाटक, ३ के. ल. ओगले, ४ पां. वा. काणे, ५ य. रा. दाते.

### काम— पुस्तकप्रकाशन

पत्रें आलीं तीं— १ डेक्कन ट्रेड आणि पब्लिशिंग कंपनी, २ सुदामा मार्ट, ३ ग. गं. जांभेकर, ४ रा. दा. देसाई, ५ महाराष्ट्र एजन्सी, ६ दामोदर. ल. लेले, ७ द. गो. सडेकर. वर्तमानपत्रांत दिलेल्या जाहिरातीवरून इतक्यांकडून चौकशीचीं पत्रें आलीं.

प्रकाशकांना ज्या शर्तीवर पुस्तक देण्याचें ठरलें त्या शर्ती.

(१) एकच आवृत्ति छापण्याची परवानगी द्यावयाची.

(२) पहिल्या आवृत्तीच्या प्रती दोन हजारांपेक्षां अधिक काढावयाच्या नाहींत.

(३) करार झाल्यापासून सहा महिन्यांत छपाईचें काम सुरू झालें पाहिजे.

(४) दहा वर्षांमध्यें पहिल्या आवृत्तीच्या प्रती संपल्या नाहींत, तरी त्या मुदतीच्या अखेर दुसरी आवृत्ती काढण्याचा हक्क म. सा. परिषदेला राहील.

(४ अ) दहा वर्षांच्या आंत प्रती खपल्यास १०० प्रती आपल्या जवळ राहिल्या कीं, प्रकाशकानें म. सा. परिषदेस कळविलें पाहिजे.

(५) हस्तलिखित प्रत— संपूर्ण किंवा कांहीं भाग— पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वी गहाळ झाली तर नुकसानी म्हणून ५०० रुपये प्रकाशकानें दिले पाहिजेत.

(६) कराराप्रमाणें मुदतींत पुस्तक न छापल्यास हस्तलिखित परत मागविण्याचा व प्रकाशनाचें काम दुसऱ्यास देण्याचा अधिकार म. सा. परिषदेला राहील. छपाईचें अर्धवट काम झालें तरी त्याच्या खर्चाची जबाबदारी परिषदेवर नाहीं.

(७) क्रौन षोडशपत्री किंवा डेमी अष्टपत्री कागद पुस्तकांसाठीं वापरावा. ग्रेट प्रायमर नं. ४ (निर्णयसागरी) आकाराचा टाईप वापरावा.

(८) पुस्तकाला कार्डबोर्डची व हाफ-क्लाथ बांधणी करून शंभर पृष्ठांना १ रुपयापेक्षां अधिक किंमत नसावी.

(९) पुस्तकावर नमूद केलेल्या किंमतीपेक्षां अधिक किंमत घेण्याचा अधिकार प्रकाशकाला म. सा. परिषदेच्या परवानगीशिवाय राहणार नाहीं.

(१०) बाळकृष्ण अनंत भिडे यांच्या पुस्तकाबद्दल ४०० रुपये माग बाकीच्या पुस्तकांबद्दल प्रत्येकीं ३०० प्रती प्रकाशकाकडून घ्याव्या.

(११) प्रकाशकाकडून कायदेशीर करार करून घेण्याचें काम कार्याध्यक्ष व रा. काणे यांजकडे सोपवावें. मोबदल्याच्या बाबतींत कमीजास्त करण्याचा अधिकार कार्याध्यक्ष, चिटणीस के. ल. ओगले, व पां. वा. काणे यांस आहे.

अनुक्रमणिका

# ज्ञानतंतु-व्यूह ( Nervous system )

( लेखकः- चिंतामण गंगाधर भानू )

## पौरस्त्य आर्यांस ज्ञानतंतू ठाऊक नव्हते काय ?

( २ )

'एक शंका' या शिरोलेखाखालीं जो लेख मीं गेल्या एका अंकांत लिहिला आहे, त्यासंबंधें थोडा समजुतीचा घोटाळा झाला आहे असें समजतें. पौरस्त्य भारतीय ऋषींस ज्ञानतंतू माहित होते, हें सिद्ध करण्याचा मी यथामति प्रयत्न करणार आहें. गेल्या अंकांतील माझी शंका म्हणजे एक वाग्युद्धाचें आवाहन आहे. "ज्ञानतंतूंची[1] माहिती आमच्या पूर्वजांस नव्हती" असें म्हणणारा एक देशी व विदेशी पक्ष आहे आणि "प्राचीनांना ज्ञानतंतूंची माहिती होती परंतु या ज्ञानतंतूंचें मूलस्थान अगर केंद्रस्थान त्यांनीं छातीखालीं धडधड करणाऱ्या काळजांत म्हणजे हृदयांत मानिलें होतें" असें म्हणणारा दुसरा पक्ष आहे. या दोन्ही पक्षांचें खंडन यथामति करावें व तें पूर्व ऋषींचें-तत्त्वज्ञान्यांचे उतारे देऊन करावें, असा या लेखावलीचा उद्देश आहे. वरील दोन्ही पक्षांच्या आचार्यांस नम्रतापूर्वक विनंति आहे कीं ही लेखावली पूर्ण झाल्यानंतर त्यांनीं माझी शंका सोडविण्याची अथवा माझे सिद्धांत खंडण्याची कृपा करावी.

हृदय व नाड्या यांचा अखंड संबंध दर्शविणारी 'हृदयस्य नाड्यः' अशा अर्थाचीं अनेक वाक्यें उपनिषदांत आढळतात; म्हणून प्रथम हृदयाचें स्थान ठरवून मग नाडी-कडे ( ज्ञानतंतूंकडे ) मी वळणार आहें.

मागच्या लेखांत ऋग्वेद, दशोपनिषदें इत्यादि प्राचीन अभियुक्त ग्रंथांतून उतारे देऊन 'हृदय' हा शब्द बहुतेक ठिकाणीं ज्ञानाचें एक साधन जें मन, त्याचा वाचक होय, असें दाखविलें.

हृदय म्हणजे ( १ ) मन आणि ( २ ) वक्षस्थलाच्या आड असलेला प्राणि-शरीरांतील अवयव असे दोन अर्थ अमरकोशकारांनीं सांगितले आहेत.

'चित्तं तु चेतो हृदयं स्वान्तं इ. इ.' 'सप्त मनसः'

अमरकोश, १ कांड, कालवर्ग श्लो. ४०

बुक्काग्रमांसं हृदयं, हृत्, मेदस्तु वपा वसा-

अमरको. २ कांड मनुष्यवर्ग श्लो. ६४

---

१ या म्हणण्याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं 'शरीरांतील' शुद्ध रक्तवाहिन्याच अंतर्बाह्य ज्ञानाची नेआण करीत असत. हा या पक्षद्वयाचे म्हणण्याचा मथितार्थ आहे, असें मीं समजतों.

येथें प्रश्न उद्भवतो, तो हा कीं दशोपनिषदांत येणारा 'हृदय' शब्द 'मन' या अर्थी घ्यावयाचा किंवा 'वक्षस्थलस्थ' हृदय घ्यावयाचें ? मीमांसाशास्त्रानें प्रणीत केलेल्या उपक्रमादि लिंगानुसार उपनिषद्वाक्यांचा अर्थ करणें अवश्य आहे. तेव्हां उद्धृत केलेल्या वाक्यांत जेथें जेथें हृदय शब्द आला आहे, तेथें तेथें मागील पुढील संदर्भ व संबंध पाहिल्यास त्या त्या हृदय शब्दाचा अर्थ मनवाचक, ज्ञानवाचक आहे, असें यद्यपि आढळून येतें, तथापि

> साधो जगति भूतानां हृदयं द्विविधं स्मृतं ॥
> उपादेयं च हेयं च विभागोऽयं तयोः शृणु ॥
> इयत्तया परिच्छिन्ने देहे यद्वक्षसोऽन्तरम्
> हेयं तद् हृदयं विद्धि तनौ एकतटे स्थितम् ॥
> संविन्मात्रं तु हृदयं उपादेयं स्थितं स्मृतम्
> ... .... ... ....
> तत्तु प्रधानं हृदयं तत्रेदं समवस्थितम्
> तदादर्शः पदार्थानां तत्कोशः सर्वसंपदाम् ॥ ३६ ॥
> योगवासिष्ठः उपशम प्र. सर्ग ७८ श्लो. ३३–३६

या योगवासिष्ठांतील उताऱ्यावरून व अमरकोशावरून स्पष्ट समजतें कीं या ग्रंथकर्त्यांच्या कालीं हृदय म्हणजे मन या अर्थाला व हृदय म्हणजे छातीखालील अवयव या अर्थाला समान प्राधान्य प्राप्त झालें होतें; त्यांतील एक अर्थ ज्ञानात्मक होता. योगवासिष्ठकार स्पष्ट म्हणतात कीं 'अनंत कोटि ब्रह्मांडें स्वस्वरूपांत सामावून घेऊन त्यांचा व तद्गत पदार्थांचा आदर्श असणारा मनोरूपी ( संविद्रूपी ) अर्थच ग्राह्य आहे. 'संवित्' अर्थ असणारें हृदयच प्रधान आहे. 'शून्यहृदया शकुंतला'-प्रभृति कवि कुलगुरू कालिदासादिकांचीं वाक्येंहि हृदय म्हणजे मन असें दर्शवितात. तेव्हां पुराण कालीं म्हणजे अभिजातग्रंथकालीं तरी हृदय व ज्ञान यांचा अत्यंत निकट संबंध आहे, असें प्रमुखतः समजत असत. हा वरील प्रश्नाचा निर्णय सर्वसंमत होईल अशी मला उमेद आहे.

हें ठरल्यानंतर दुसरा प्रश्न असा कीं ज्ञानदृष्टीनें 'वक्षःस्थलांत असणारें हृदय जर "हेय" आहे, तर प्राणिशरीरांत मन, बुद्धि, चित्त, अहंकार यांचें आश्रयस्थान म्हणजे वासिष्ठांतील उपादेय हृदय-स्वरूप –प्राचीन मताप्रमाणें हृदयस्वरूप — कसें असलें पाहिजे ?

खालील बृहदारण्यांतील व छांदोग्यांतील वाक्यें या प्रधान हृदयाच्या स्वरूपाचा पत्ता लावून देतात काय पाहूं याः-—

बृहदा० ४।२।३

तयोः एष संस्तावः यः एष अंतर्हृदय आकाशः....एनयोः एतदन्नं, य एष अंत-

हृदये लोहितपिंडः....एतयोः एतत्प्रावरणं यदेतदन्तर्हृदये जालकं इव एनयोः एषा सृतिः संचरणी या हृदयादूर्ध्वा नाड्या उच्चरति...हिताः नाम नाड्यः अन्तर्हृदये प्रतिष्ठिताः भवन्ति । एताभिः वै एतत् आस्रवदास्रवति । तस्मादेषः प्रविविक्ताहारतर इवैव भवति । अस्माच्छरीरादात्मनः

बृहदा० २।२।१,२,३.

अयं वाव शिशुः योऽयं मध्यमः प्राणः । तस्येदमेवाधानमिदं प्रत्याधानं, प्राणः स्थूणा अन्नं दाम ॥१॥

अर्वाग्बिलश्चमसः ऊर्ध्वबुध्नस्तस्मिन्यशो निहितं विश्वरूपम् । तस्यासत ऋषयः सप्त तीरे वागष्टमी ब्रह्मणा संविदानेति । इ० ॥३॥

बृहदा० २।४।११

....सर्वासां विद्यानां हृदयमेकायनम्....॥११॥

बृह० २।१।१९ भाष्य.

'हिता इत्येवंनाम्न्यो नाड्यः शिरा- देहस्यान्नरसविपरिणामभूताः । ताश्च द्वासप्ततिः सहस्राणि हृदयात्—हृदयं नाम मांसपिंडः तस्मात्—पुंडरीकाकारात् पुरिततं—हृदयपरिवेष्टनमाचक्षते—तदुपलक्षितं शरीरमिह पुरितच्छब्देनाभिप्रेतं....शरीरं कृत्स्नं व्याप्नुवत्यः बहिर्मुख्यः प्रवृत्ता इत्यर्थः । तत्र बुद्धेरंतःकरणस्य हृदयं स्थानं । तत्रस्थ-बुद्धितंत्राणि चेतराणि बाह्यानि करणानि । तेन बुद्धिः कर्मवशाच्छ्रोत्रादीनि ताभिर्नाडीभिर्मत्स्यजालकवत्कर्णशष्कुल्यादिस्थानेभ्यः प्रसारयति...अधितिष्ठति जागृतिकाले । ...संकोचनकाले च तस्या अनुसंकुचति

छां. ८।१।१

अथ यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म, दहरोऽस्मिन्नन्तराकाशस्तस्मिन्यदंतस्तदन्वेष्टव्यं । तद्वाव विजिज्ञासितव्यं ॥१॥

अर्थः— पहिला उतारा

अंतर्हृदयांत जें आकाश आहे, तें-पुरुषप्रकृतीचें-वास्तव्य क्षेत्र- आहे.

अंतर्हृदयांत जो लोहितपिंड—अन्नाचा अत्यंत सूक्ष्म पिंडाकार असतो— तो पुरुषाचे—इंद्राणीसह हृदयांत एकत्र असणाऱ्या इंद्राचें म्हणजे लिंगात्म्याचें— अन्न होय.

अनेक नाडीसमूहांच्या जणो जाळ्यानें तयार झालेला अंतर्हृदयांतील समूह हा यांचें पांघरूण आहे.

जी ऊर्ध्वमुखी हितानामक नाडी हृदयदेशांतून वर जाते म्हणजे स्वप्नापासून जीवाला जागृत अवस्थेस आणते, ती नाडी या लिंगात्म्याचा संचारमार्ग आहे. हिता हें नांव असणाऱ्या अनेक नाड्या हृदयांत म्हणजे मांसपिंडांत प्रतिष्ठित असतात. त्यांतील ऊर्ध्वमुख नाडी लिंगात्म्याचा संचारमार्ग होते. हृदयांत असलेल्या नाड्या सर्व

शरीरभर पसरलेल्या असतात. या नाडया अत्यंत सूक्ष्म असून तद्द्वाराच अन्नरस सर्व शरीराला मिळतो. पण लिंगात्मा अतिसूक्ष्म असल्यामुळें त्याच्या धारणपोषणाला अतिसूक्ष्म अन्नरस हवा असतो. तो हितानाडयांकडून लिंगात्म्यास प्राप्त होतो. हा लिंगात्मा तैजस होय. याचें वास्तव्य सूक्ष्म असणाऱ्या हृदयाच्या आकाशांत असतें. यालाच दहराकाश म्हणतात.

दुसरा उतारा. बृ २।२।१–३

मध्यमप्राण म्हणजे लिंगात्मा हा लहान बालक आहे. त्याचें अधिष्ठान हें सर्व शरीर होय. कारण ह्या शरीरांतच सर्व ज्ञानेंद्रियें आपआपले व्यापार करतात. तथापि मस्तक हें त्या लिंगात्म्याचें प्रत्याधान आहे; म्हणजे मस्तकप्रदेशांतील निरनिराळीं स्थानें हींच त्याचीं विशिष्ट अशीं निवासस्थानें होत.

यज्ञांतील चमसपात्राप्रमाणें हें मस्तक आहे. म्हणजे याचें मुख ( बिल ) खालीं व तळ म्हणजे बुंधा ( बुध्न ) वर आहे. त्या या मस्तकामध्यें नानारूपीं यशें म्हणजे प्राण म्हणजे कर्णनेत्रादि ज्ञानेंद्रियें ठेवलीं आहेत. म्हटलें आहे कीं या शिरोरूपी चमसाच्या तीरीं सात ऋषी म्हणजे इंद्रियरूपी प्राण आणि आठवी वाणी आहे. ही वाणी ब्रह्माशीं संवाद करिते इ. इ. ॥३॥

उतारा तिसरा. बृ. २।४।११

हृदय हें सर्व विद्यांचें संग्रहस्थान आहे.

चवथा उतारा भाष्य. बृ. २।१।१९

अन्नरसाचा विकार झालेल्या 'हिता' नामक नाडया ७२००० आहेत. त्या कमलाकार हृदयनामक मांसपिंडांतून निघून हृदयाचें वेष्टन असणाऱ्या पुरिततीभर(पुरितती हें शरीराचें उपलक्षण आहे म्हणून सर्व शरीरभर) पसरल्या आहेत. या सर्व बहिर्मुख ( बाहेरचें ज्ञान आंत आणणाऱ्या व आंतील हेतू बाहेर नेणाऱ्या, असा स्पष्टार्थ करतां येईल काय ? ) आहेत. आतां बुद्धीचें वास्तव्यस्थान हृदय आहे. तिच्या स्वाधीन सर्व ज्ञानांचीं व कर्मांचीं अंतर्बाह्य इंद्रियें असतात. अर्थात् बुद्धीला कांहीं कार्य करणें असल्यास ती जाळ्याप्रमाणें पसरलेल्या नाडींच्याद्वारा कर्णादि स्थानापासून श्रवणेंद्रियादिकांचा प्रसार करिते. हा जागेपणचा व्यवहार होय आणि निद्राप्रसंगीं इंद्रियांचा नाडीद्वारा संकोच करिते. तात्पर्य, हृदयांत राहून बुद्धि इंद्रियांचा विकास करिते, तें जागेपण होय; इंद्रियांस आंखडून घेतलें म्हणजे स्वप्नावस्था किंवा सुषुप्ति होय.

पांचवा उतारा. छां. ८।१।१

ब्रह्माचें ज्ञानविज्ञान करून देण्यास समर्थ असणाऱ्या या मानवीदेहांत एक लहानसें कमल ( हृदयकमल ) आहे. त्यांत एक लहानसें आकाश आहे. त्या आकाशांत राहणारा जो त्याचें शोधपूर्वक ज्ञान करून घेणें अत्यंत इष्ट आहे.

या पांच उताऱ्यांवरून हें स्पष्ट सिद्ध होतें कीं हृदय हें मूर्त आहे व बुद्धि, मन, इंद्रियें यांचेंच केवळ नव्हे तर लिंगात्म्याचें व निष्कल आत्माराम उपलब्ध होण्याचें स्थान आहे. आणि हें हृदय मस्तकांतच आहे. मस्तिष्क म्हणजे मेंदू. म्हणजे ज्ञानाचें वास्तव्यस्थान मस्तकच आहे, असें मस्तिष्क शब्दहि सांगतोच कीं.

ज्ञानैकपर दशोपनिषदांतील हृदय व नाडया यांचा संबंध दाखविणारे उतारे.

....हिता नाम नाडयः द्वासप्तति: सहस्राणि हृदयात् पुरीततं अभिप्रतिष्ठन्ते, ताभि: प्रत्यवसृप्य....एष....पुरीतति शेते. बृह० २।१।१९

या मंत्रावरील श्रीमच्छंकराचार्यांचें भाष्य उद्धृत करून त्याचा अर्थ पृ. ६ वर दिला आहे. हृदयांतून निघणाऱ्या नाडयांचा प्रसार व संकोच जीव करतो. नाडया शरीरभर पसरल्या म्हणजे जीव जागृतावस्थेंत असतो आणि त्यानेंच त्यांचा संकोच केला म्हणजे तो प्रथम स्वप्नावस्थेंत व नंतर गाढ झोंपेंत प्रविष्ट होतो. नाडयांचें पसरणें म्हणजे बाह्य वस्तूंचें ज्ञान होणें आणि त्यांचें मिटणें म्हणजे बाह्य ज्ञानशून्य अवस्थेंत शिरणें होय. म्हणजे या नाडया म्हणजे ज्ञानतंतू ( Nerves ) कीं काय ?

या एता हृदयस्य नाडयस्ता: पिंगलस्याणिम्न: तिष्ठंति, शुक्लस्य, नीलस्य, पीतस्य लोहितस्येत्यसौ वा आदित्य: पिंगल:, एष शुक्ल:, एष नील:, एष पीत:, एष लोहित: ॥ (छांदो० ८।६।१)

आचार्य म्हणतात "ब्रह्मोपासनेचें स्थान जें पुंडरीकाकार हृदय, त्या हृदयाच्या मांसपिंडांतून निघून सर्व शरीरभर प्रसृत होणाऱ्या नाडया[२] पिंगल, किंवा शुक्ल, नील, पीत, लोहित वर्णाच्या एक प्रकारच्या विशिष्ट अशा सूक्ष्मरसानें[३] पूर्ण भरलेल्या असतात. सर्व सूर्यतेजच असतें. परंतु अल्पकफाच्या संपर्कानें नाडया पिंगल, वातप्राचुर्याच्या संपर्कानें नील, कफप्राचुर्यानें शुक्ल, कफ सम असेल तर पीत, शोणितबाहुल्य असेल तर लोहित वर्णाच्या होतात. एकच सूर्यतेज कफवातादिकांच्या कमी अधिक प्रमाणानें पिंगलादि वर्णांचें होतें. तात्पर्य ज्ञानाची व कर्माची प्रेरणा करणारें एकच सूर्यतेज शारीरिक वात-

२ दशोपनिषदें अथवा योगशास्त्र यांतील नाडी हा शब्द केवळ ज्ञानतंतूचाच वाचक आहे असें आम्हांस वाटतें. कारण प्राणादिवातांच्या निरोधनाचें कार्य अगर वाताला त्या त्या स्थलीं नेण्याचें कार्य यांचा व रक्तवाहिन्यांचा प्रत्यक्ष असा कांहीं संबंध नाहीं. शिवाय मनाच्या अनेक प्रकारच्या वृत्तींशीं ज्ञानतंतूंचा जो निकट संबंध आहे तसा त्यांचा रक्तवाहिन्यांशीं तर बिलकूलच संबंध नाहीं. या ठिकाणीं "नाडया" ह्या सूक्ष्मरसानें भरलेल्या असतात असें वर्णन आलेलें आहे. अर्थात् हा सूक्ष्मरस रक्त अथवा त्यासारखा स्थूल द्रवपदार्थ नसून तो ह्या ज्ञानतंतूमध्यें राहणारा अणिष्ठ म्हणजे अत्यंत सूक्ष्म असा पदार्थ आहे व रक्तासारखे शारीरिक द्रव पदार्थ ह्या अणिष्ठ रसाहून वेगळे आहेत, असें स्पष्ट वर्णन बृहदारण्यक २।१।२ यावरील शांकरभाष्यांत आलेलें आहे तें जिज्ञासूंनीं वाटल्यास वाचावें.

३ बुद्धीचें वास्तव्य हृदयांत असून ती त्याचे संकोचविकास करणारी आहे. आणि इंद्रियें चमसपात्रासारख्या मस्तकांत आहेत, या गोष्टी स्मरणीय आहेत.

पित्तादिकांच्या संमिश्रणानें भिन्नभिन्न रंगांचें होतें. सूर्यतेजानें पूर्ण भरलेल्या ज्ञानवाहक वं कर्मप्रेरक नाडया कफपित्तांच्या प्रमाणानुसार भिन्न वर्णांच्या होतात.

अरा इव रथनाभौ संहता यत्र नाडयः । स एष अंतश्चरते.... (मुंडक २।२।६)

रथाच्या नाभीमध्यें ( तुंबा ? ) जशा अरा बसवितात; त्याप्रमाणें सर्व शरीरभर पसरलेल्या नाड्या ज्या हृदयांत बसविलेल्या असून तेथून त्या पसरतात, त्यामध्येंच बुद्धिप्रत्ययाचा साक्षी जो आत्मा तो राहतो. तात्पर्य हृदय हें नाडींच्या उत्पत्तीचें व आत्म्याच्या वास्तव्याचें स्थान आहे.

हृदि ह्येष आत्मा । अत्रैतदेकशतं नाडीनां....आसु व्यानश्चरति (प्रश्न ३।६)

हृदयांतच हा आत्मा राहतो. ह्या हृदयांतून शंभर व १ मिळून १०१ प्रधान नाडया निघतात. त्याच्या शाखा सर्व नाडया....या नाडयांत व्यानवायूचा संचार आहे.

शतं चैका च हृदयस्य नाडयः इ. इ. (कठ ६।१६)

हृदयापासून निघणाऱ्या प्रधान नाड्या शंभर आणि एक. त्यांतील सुषुम्ना नामक एक ऊर्ध्वगामी नाडी मोक्षवाहक व बाकीच्या जन्ममरणाच्याकडे नेणाऱ्या आहेत.

ह्या सर्व उपनिषद्वाक्यांत हृदय व नाड्या यांचा मायलेकींचा संबंध दिसतो; हृदयापासून नाड्या निघतात, पसरतात व संकोच पावतात. उपनिषत्कालीं हृदयाचा अर्थ मन ( किंवा मनाच्या व्यापारांचें स्थान ) असा होता. ऋग्वेदकालींहि ह्याच अर्थ होता. हृदय हेंच जीवात्म्याचें व लिंगात्म्याचें स्थान होतें. मस्तकांतील निरनिराळे प्रदेश हे लिंगात्म्याचीं वास्तव्यस्थानें होत. ( बृ. २।२।१–३ ). तेव्हां ज्ञानवाहक नाडयांशीं संबद्ध असलेलें हृदय हें मस्तकांत असलें पाहिजे. म्हणजे प्राचीन आर्ष-तत्त्वज्ञांस ज्ञानवाहक व कर्मप्रेरक नाडया माहित होत्या, त्यांस Nerves माहित होत्या असें माझ्या मनानें ठरतें. कफादिकांच्या प्राचुर्यामुळें स्वच्छ ज्ञान कलुषित होतें, काविळ असलेला मनुष्य सर्वत्र पिंवळा रंग पाहतो, हें प्रसिद्ध आहे. असो; तज्ज्ञांनीं ह्याचा विचार करावा. "वादे वादे जायते तत्त्वबोधः" हा न्यायच आहे. 'तुटे वाद, संवाद तो आदरावा," ही विनंति आहे.

ह्यानंतर योगप्रणायक विशेष उपनिषदांत व षट्चक्रनिरूपणांत काय म्हटलें आहे तें पाहावयाचें आणि शेवटीं चरक, सुश्रुतप्रभृती शरीरशास्त्रवेत्ते काय सांगतात, हें पाहून आजला कोणतें मत प्रचलित आहे, त्याचें कथन करावयाचें; हा भाग पुढील लेखाकरितां ठेवतों.

---

# भारतीय कृषिशास्त्र

( लेखक — कै० कृष्णाजी विनायक वझे. )

वृक्षादिप्रसवारोपपालनादिक्रिया कृषिः ॥ भृगुसंहिता.

कृषि हा शब्द कृष् ( कर्ष ) ओढून काढणें या धातूपासून निघाला आहे. पृथ्वीपासून ओरखडून काढण्याचें शास्त्र या अर्थाचा हा शब्द आहे. या पृथ्वींतून ओढून काढलेल्या जिनसांना धनधान्य किंवा पशु व वनस्पति असें म्हणतात.

कृषिशास्त्रकारांच्या मतें एकटा निर्गुण परमात्मा मात्र 'विश्वभुक् व अव्यय' आहे. तो वाटेल तें सर्व खातो व कांहींहि टाकीत नाहीं. सर्व गोष्टी त्याला सोसतात व पचतात. यांत विकार होऊन सृष्टि झाली. या सृष्टींतील सर्व वस्तूंना आवड निवड आहे. कृषिशास्त्र या सृष्टींतील वस्तूंचें.

ततो विष्वङ् व्यक्रामत्साशनानशने अभि ।

साशन म्हणजे खाणारे व अनशन म्हणजे न खाणारे असे दोन प्रकार करतात. हिंदी शास्त्रकारांच्यामतें जीव सर्वव्यापी आहे; म्हणून ते सृष्टींतील वस्तूंचें सजीव व निर्जीव असें वर्गीकरण न करतां ते साशन व अनशन असें वर्गीकरण करतात. यांपैकीं अनशन वस्तूंचा विचार जलशास्त्र व खनिशास्त्र यांत करण्यांत येईल. कृषिशास्त्रांत फक्त साशन वस्तूंचा विचार करावयाचा आहे. साशन वस्तूंत अन्नाचा सारखा प्रवाह वहात असतो म्हणून त्यांना सस्रोत असेंहि नांव दिलेलें आहे व त्या धोरणानें अनशन वस्तूंना अस्रोत असें नांव आहे.

सस्रोत वस्तूंचे खाण्याच्या प्रवाहाच्या दिशेवरून तीन प्रकार करण्यांत येतात. ( १ ) ऊर्ध्वस्रोत ( २ ) तिर्यक्स्रोत व ( ३ ) अर्वाक्स्रोत असे ते तीन प्रकार होत.

ऊर्ध्वस्रोतः सप्तमस्तु षड्विधस्तस्थुषां चयः ॥ कृषिशास्त्र

ऊर्ध्वस्रोत ही सातवी पायरी असून तींत सहा प्रकारच्या ( वनस्पतींचा ) झाडांचा समावेश होतो. हे सहा प्रकार म्हणजे

वनस्पत्योषधिलतात्वक्सारावीरुधद्रुमाः ॥

( १ ) वनस्पति ( २ ) ओषधी ( ३ ) लता ( ४ ) त्वक्सार ( ५ ) वीरुध व ( ६ ) द्रुम असे आहेत. त्यांपैकीं वनस्पति म्हणजे

अपुष्पफलिनो ये च ते वनस्पतयः स्मृताः ॥

ज्यांना पाने, फुलें, फळें, वगैरे अवयवभेद नाहींत त्यांना वनस्पति म्हणतात. यांना इंग्रजींत Thalogens or Creepers म्हणतात.

ओषधयः फलपाकांताः बहुपुष्पफलोगमाः ॥

फळें पिकेपर्यंत जीं झाडें जगतात तीं एक हंगाम जगणारीं झाडें म्हणजे 'ओषधी' होत. यांना इंग्रजींत Acrogens म्हणतात.

बीजकांडसमुद्भूताः प्रताना वल्लय एव च ॥

बियापासून अगर तुकड्यापासून वाढणाऱ्या व दुसऱ्याच्या आश्रयाशिवाय उंच न चढणाऱ्या त्या वेली होत. या वेलींचा पाश्चात्य वनस्पतिशास्त्रकारांनीं निराळा वर्ग केला नाहीं. यांना इंग्रजींत criptogens म्हणतात.

गुच्छगुल्मं तु विविधं त्वक्सारमिति गद्यते ॥

कांदा, केळ वगैरेसारखे नुसत्या पापुद्र्यांचे झालेले वृक्ष ते त्वक्सार होत. हाहि निराळा वर्ग पाश्चात्यांनीं केलेला नाहीं.

अंतःसाराश्च वृक्षाः पनसतरुमुखाः ।
नारिकेलक्रमुकयवफलाद्या बहिःसारवृक्षाः ॥
पुष्पिणः फलिनश्चैव वृक्षास्तूभयधा स्मृताः ॥

वृक्षांचे त्यांच्या वाढीवरून व सारावरून दोन प्रकार होतात. ज्यांची वाढ आंत होते ते Endogens. यांचा घट्ट भाग बाहेर असतो, म्हणून यांना 'बहिःसार' म्हणतात. ज्यांची वाढ बाहेर होते ते Exogens. यांचा सार ऊर्फ घट्ट भाग आंत असतो म्हणून यांना 'अंतःसार' म्हणतात. याप्रमाणें वनस्पतींचें वर्गीकरण करण्याची पाश्चात्यांची दृष्टि निराळी व हिंदी शास्त्रकारांची दृष्टि निराळी आहे. बाकी वर्गीकरणाचा अर्थ किंवा प्रकार एकच आहे. या सातहि प्रकारच्या वनस्पतींत अन्नाचा प्रवाह खालून म्हणजे पृथ्वीच्या पोटाकडून वर म्हणजे आकाशाकडे चाललेला असतो म्हणून यांना ऊर्ध्व-स्रोत, उत्स्रोत अशीं नांवें आहेत. हा साशन वस्तूंतील पहिला प्रकार होय. ह्यांना 'हारिद्रव' हिरव्या ( रक्ताचे ) रसांचे प्राणी असेंहि नांव आहे. हे हिरव्या रसाचे प्राणी तांबड्या रसाच्या प्राण्यांना पूरक आहेत हें पुढें स्पष्ट करण्यांत येईल.

तिरश्चामष्टमःसर्गो योऽष्टाविंशद्विधःस्मृतः ॥

ज्यांचा अन्नाचा प्रवाह उभ्या रेषेंत न चालतां तिरप्या किंवा आडव्या रेषेंत चालतो ते तिर्यक्स्रोत, तिर्यग्योनि, तिर्यक्, अशा नांवानें ओळखले जाणारे प्राणी होत. यांचे हिंदुशास्त्रकारांनीं अठ्ठावीस प्रकार केलेले आहेत. ज्याप्रमाणें पाश्चात्यशास्त्र-कारांनीं वनस्पतींचे सहाच प्रकार केले आहेत तसेंच त्यांनीं जनावरांचे पण अठ्ठाविसच प्रकार केलेले आहेत. दोन्ही साशन प्राण्यांचें वर्गीकरण करतांना पाश्चात्यांची दृष्टी त्यांच्या शरीररचनेकडे व वाढीकडे आहे. आणि हिंदुशास्त्रकारांची दृष्टी त्यांच्या घटनेवर व मनोधर्मावर आहे.

एकादशधा इंद्रियाणि नवधा तुष्टिः अष्टधा शक्तिः ॥

मनासकट अकरा इंद्रियें, नऊ प्रकारचा संतोष व आठ प्रकारची कार्यशक्ति

असे हिंदुशास्त्रकारांनीं प्राण्यांचे अठरा प्रकार केले आहेत. एक इंद्रिय असणारे प्राणी, दोन इंद्रियें असणारे प्राणी, व अकरा इंद्रियें व एक तुष्टि, दोन तुष्टि असणारे प्राणी आणि शेवटीं अकरा इंद्रियें, नऊ तुष्टि व एकशक्ति, दोनशक्ति असे प्राण्यांचे भेद हिंदी शास्त्रकारांनीं केले आहेत. याप्रमाणें या अठ्ठावीस गोष्टींचे अंकपाश Permutations and combinations करून प्राण्यांच्या चौऱ्यायशीं लक्ष योनी हिंदुशास्त्रकारांनीं निश्चित केल्या आहेत. पाश्चात्य प्राणिशास्त्रकारांनीं मुख्य अठ्ठावीस भाग केले आहेत. परंतु पुढें त्यांना काय होईल अगर झालें पाहिजे हें निश्चित करतां येत नसल्यानें जितके प्राणी आज त्यांना ठाऊक आहेत तितके वर्ग केले आहेत व नवा प्राणी सांपडला म्हणजे त्याच्या वर्णनावरून नवा वर्ग जरूर तर करून त्याला नवें नांव ठेवावयाचें अशी त्यांची वहिवाट आहे. एकंदरींत पाश्चात्यशास्त्रें तत्त्वाच्या कसोटीवर अद्याप अपुरीं असल्याचें आढळून येतें व त्यांची विचार करण्याची पद्धति कच्ची अतएव अशास्त्रीय आहे असें म्हणावें लागतें. तात्पर्य, पाश्चात्यशास्त्रांत दोन मोठे दोष दिसतात. ( १ ) त्यांचें शास्त्र सृष्टीच्या प्रारंभापासून शेवटापर्यंत घडणाऱ्या सर्व गोष्टींचा विचार करीत नाहीं व ( २ ) जो विचार करतें तो निश्चित तत्त्वानुसार गणितासारखे अगदीं स्पष्ट तुकडे पाडणारा नसतो. त्यांचे विचार तात्पुरते, तात्कालिक असतात व ते अनिश्चित व चुकीला पात्र म्हणून नेहमीं बदलणारे असतात. याशिवाय त्यांच्याकडे अद्याप सर्व शास्त्रांची एकवाक्यता झालेली नाहीं, त्यांचें एकीकरण झालेलें नाहीं, एक सर्वव्यापी अशी परिभाषासुद्धां त्यांची झालेली नाहीं.

अर्वाक्स्रोतस्तु नवमः केवलैकविधो नृणां ॥

ज्यांचा अन्नाचा प्रवाह वरून खालीं म्हणजे आकाशाकडून पृथ्वीच्या गर्भाकडे चालतो असा साशनवस्तूंचा वर्ग म्हणजे अर्वाक्स्रोत, ऊर्ध्वमूल, अधःशाख, या नांवांनीं ओळखला जाणारा वर्ग होय. यांत एक नर हाच प्रकार आहे. या नराचे बिघडलेले किंवा तिर्यक्स्रोत व अर्वाक्स्रोत या वर्गांना जोडणारे सृष्टीचे दुवे म्हणजे किन्नर ( अस्वल ), वानर ( माकड ) हे होत. किं + नर म्हणजे वाईट झालेले, बिघडलेले नर व वा + नर म्हणजे संशयित नर होत. सृष्टीनें नर करतांना बिघडलेल्या जिनसांचे हे किंन्नर, किंपुरुष, वानर वगैरे प्राणी होत.

साशन प्राण्यांत अन्नाचा प्रवाह कोणत्या दिशेनें वाहतो यावरून त्यांचें वर्गीकरण झालें. याशिवाय हे प्राणी सामान्यतः कोठें राहतात यावरून त्यांचे आप्य, आरण्य किंवा भौम व वायव्य असे तीन प्रकार होतात. कृषीचेहि शास्त्रकारांनीं असेच तीन प्रकार केले आहेत.

पशूंस्तांश्चक्रे वायव्यानारण्यान् ग्राम्यांश्चये ।

आप्य किंवा ग्राम्य ( ग्रम् गिळणें यापासून ) प्राणी म्हणजे पाण्यांत राहणारे

प्राणी होत, आरण्य किंवा भौम म्हणजे जमिनीवर राहणारे प्राणी होत, व वायव्य म्हणजे हवेंत राहणारे प्राणी होत. यांना अंतरीक्ष असेंहि नांव आहे. आप्य व ग्राम्य प्राण्यांना जोडणारा दुव्वा म्हणजे बेडूक, सुसर, कासव वगैरे प्राणी होत; आरण्य व वायव्य यांना जोडणारे प्राणी म्हणजे पाकोळया, वडवाघळें वगैरे होत, व आप्य आणि वायव्य यांना जोडणारे प्राणी म्हणजे हंस, कारंडव वगैरे प्राणी होत. तात्पर्य आप्य-कृषि म्हणजे मासे मारणें, मीठ काढणें, शंख, शिंपा, मोतीं, पोंवळीं वगैरे काढणें, ही होय; भौमकृषि म्हणजे शेती बागाईत व गुरेंढोरें पाळणें, हरणें वगैरेंची शिकार करणें ही होय; व वायव्यकृषि म्हणजे पांखरें धरणें, अंडीं तयार करणें, पिसें वगैरे काढणें ही होय. धातु, पाषाण वगैरे गोष्टी खोदून काढाव्या लागतात म्हणून त्यांचा समावेश खनि नांवाच्या निराळ्या शास्त्रांत केला आहे.

या प्राण्यांत चालणाऱ्या रसाच्या प्रवाहावरून यांना हारिद्द्रव व रक्तद्रव अशीं नांवें आहेत. हारिद्द्रव प्राण्यांतील रस हिरवा किंवा पांढुरका असतो व रक्तद्रव प्राण्यांतील रस लाल पांढरा असतो. हारिद्द्रव प्राणी अनशन जिनसांचें रूपांतर साशन जिनसांत करतात. हे 'हारिमाण' वायु भक्षण करून 'प्राण' वायु बाहेर टाकतात. हवा, पाणी, माती व सूर्यप्रकाश यांच्यापासून नानारुची, नानारंग, नानावास, व नाना आकारांच्या वस्तु तयार करतात. यांचे रसायन व्यापार फार विलक्षण आहेत. अगदीं शेजारीं वाढणारीं झाडें निरनिराळे गंध, रुची व रंग कसे निर्माण करीत असतील याचा शोध अद्याप लागलेला नाहीं. रक्तद्रव प्राण्यांना अनशन वस्तूंवर निर्वाह करतां येत नाहीं. हे प्राणवायु खाऊन हारिमाण वायु बाहेर टाकतात. या प्राण्यांच्या रसायन क्रियेत दूध निर्माण होतें ही एकच मोठी गोष्ट असते. दूध ही जिन्नस अत्यंत उपयोगी आहे. अगदीं लहानपोरापासून म्हाताऱ्या जख्ख माणसापर्यंत सर्वांना उपयोगी असें खाद्य आहे. हें सर्वांना सोसतें व पचतें. अंडीं हेंहि दुधासारखेंच खाद्य आहे. परंतु त्यांत पिलांची हत्या होते हा मोठा दोष आहे तो दुधांत नाहीं. पिलांचें पोषण करून इतरांचें पोषण दूध करूं शकतें,

या प्राण्यांच्या खाण्याच्या जिनसांवरूनहि त्यांचे दोन प्रकार होतात. (१) वनस्पत्याहारी व (२) मांसाहारी. झाडांत सुद्धां मांसाहारी झाडें आहेत. रामायणांतील कबंध राक्षस हें एक झाडच होतें. अशीं मांसाहारी झाडें आज आफ्रिका खंडांत आहेत. पशूंत, पक्ष्यांत, माणसांत तर वनस्पत्याहारी व मांसाहारी असे भेद आहेतच. माणसें हीं माकडांपासून उत्क्रांत झालीं असें म्हटलें म्हणजे तीं वनस्पत्याहारीच असलीं पाहिजेत. पृथ्वीवर मांसाहारी माकडें कोठेंहि सांपडत नाहींत. परंतु मांसाहारी माणसें सर्वत्र म्हणजे अगदीं रानटी समाजापासून अत्यंत सुधारलेल्या समाजापर्यंत सगळीकडे सांपडतात. यावरून हिंदुशास्त्रकारांचेंच म्हणणे बरोबर दिसतें. माणसें हीं स्वतंत्रच सृष्टि असून तींत इतर भागाप्रमाणें वनस्पत्याहारी व मांसाहारी वर्ग निसर्गतःच आहेत. वन-

स्पत्याहारी माणसांचे शेती करणारे समाज होतात व मांसाहारी माणसांचे शिकार करणारे समाज होतात. पहिल्या समाजाला सुर, देव, वगैरे नांवें असून मांसाहारी समाजांना असूर, दानव, राक्षस अशीं नांवें आहेत. या दोन समाजांची याप्रमाणें मुळापासून शेंड्यापर्यंत सगळीच रचना भिन्नभिन्न होते. शेती करणाऱ्या समाजांत एकत्र कुटुंबपद्धति, बालविवाह, जातिव्यवस्था, दैववाद, दयाशीलता, व राजशासन या गोष्टी प्रमुख असतात, तर शिकार करणाऱ्या समाजांत विभक्त कुटुंब, प्रौढविवाह, प्रयत्नवाद, कपटशीलता व स्वैरपणा हे गूण प्रमुख असतात. सुरसमाजाची संस्कृति धन-धान्यांवर अवलंबून असते तर असुरसमाजाची संस्कृति धातुपाषाणावर अवलंबून असते. यामुळें सुरसंस्कृति सनातन अगर शाश्वत असून असुरसंस्कृति नाशवंत आहे.

येथवर कृषिशास्त्रांत कोणत्या वस्तूंसंबंधाचा विचार करण्यांत येतो तें सांगितलें. त्या वस्तू म्हणजे वृक्ष, पशु व मनुष्य किंवा धान्यधन नर होत. या वस्तूंच्या विचार करण्यासारख्या पुष्कळच गोष्टी आहेत. त्यांपैकीं १ ( १ ) प्रसव किंवा उत्पत्ति. (२) आरोप किंवा वाढ व ( ३ ) पालन किंवा उपयोग, या तीनच बाबींचा विचार कृषिशास्त्र करतें. वनस्पतींची शरीररचना कशी असते याचा विचार वनस्पतिशास्त्र Botany करतें. वनस्पतींत औषधी गुणधर्म कोणते आहेत याचा विचार औषधीशास्त्र Materia Medica करतें. परंतु वनस्पतींची लागवड कशी करावी, त्यांची जोपासना कशी करावी व त्यांचा संग्रह किंवा सांठा कसा करावा हें कृषिशास्त्र सांगतें. पशूंच्या शरीररचनेचा विचार Zoology प्राणिशास्त्र करतें. त्यांचे गुणधर्म, मानस क्रिया वगैरेंचा विचार Biology जंतुशास्त्र करतें. त्यांच्या रोगांचें निदान व औषधोपचार Veterinary शालिहोत्रशास्त्र करतें. परंतु पशूंची निपज, त्यांचें शिक्षण व वाढ आणि त्यांचे मनुष्यसमाजांत उपयोग यांचें विवेचन कृषिशास्त्र करतें. माणसांच्या शरीररचनेचा विचार Anatomy शरीरशास्त्र करतें, त्या शरीरांतील व्यवस्थेचा विचार Physiology निदानशास्त्र, त्याच्या मानस व्यापारांचा विचार Psychology योगशास्त्र, त्याच्या धार्मीक भावनांचा विचार Theology धर्मशास्त्र, त्याच्या राजकीय व्यवहारांचा विचार Politics शासनशास्त्र, त्याच्या व्यापारधंद्यांचा विचार Economics वृत्तिशास्त्र, त्याच्या समाजरचनेचा विचार Sociology लोकविद्या वगैरे शास्त्रें करतात. परंतु कृषिशास्त्र माणसांची निपज Eugenics, त्यांचें शिक्षण Education व त्यांचें पालन म्हणजे व्यवहारांत उपयोग Organization यांचा विचार करतें. इतर शास्त्रांचे सिद्धांत पाया म्हणून स्वीकारून त्या पायावर कृषिशास्त्र आपली मांडणी करीत असतें. यावरून कृषिशास्त्र म्हणजे काय आहे याची कल्पना येईल.

कृषिशास्त्रांत वर सांगितल्याप्रमाणें वृक्षविद्या, पशुविद्या व मनुष्यविद्या अशा तीन विद्या आहेत हें उघडच आहे. परंतु कृषिशास्त्रांत कोणत्या कलांचा समावेश

होतो हें समजलें तर त्यावरून या शास्त्राची जास्त स्पष्ट कल्पना येईल; म्हणून त्या कलांबद्दल थोडें विवेचन करतों. वृक्षविद्येंत (१) सीराद्याकर्षण, वृक्षारोपण, यावादीक्षुविकार व वेणुतृणादिकृति अशा चार मुख्य कला आहेत. सीराद्याकर्षण म्हणजे झाडांच्या साली, बोंडें वगैरेपासून सुतासारखे धागे काढणें होय. अंबाडीचा वाख, तागाचा ताग, कापसाचे धागे, केळीचे तंतु वगैरे या कलेचीं उदाहरणें होत. वृक्षारोपण म्हणजे झाडांचीं कलमें करणें. यांत आंबा संत्रें, वगैरेंचीं कलमें तर प्रसिद्ध आहेत. परंतु परागारोपण ही क्रिया आपण विसरलों आहोंत. पाश्चात्य लोक तिचा अभ्यास आज करीत आहेत. आरोपणांत (१) बीजारोपण, (२) कांडारोपण, (३) स्कंधारोपण, (४) अंकुरारोपण व (५) परागारोपण असे पांच प्रकार आहे. त्यांचें विवेचन पुढें यथास्थल येईलच. यावादीक्षुविकार म्हणजे उंस वगैरेपासून गूळ, साखर, काकवी व मद्य वगैरे तयार करण्याची कला. यांत अनेक लोणचीं, मुरांबे व जिन्नस पुष्कळ दिवस टिकेल व वाटेल तेव्हां स्वाद घेण्यास सांपडेल असे प्रकार आहेत. वेणुतृणादिकृति म्हणजे वांबू, गवत वगैरेंचे कुंचे, चटया, पडदे वगैरे विणणें होय. असल्या कला कृषिशास्त्रांत वृक्षविद्येंत येतात. रंगीत कापूस झाडास आणणें, फळांतील बिया नाहींशा करणें, वगैरे अनेक कलांचा विचार या विद्येंत करतात.

पशुविद्येंत (१) गजाश्वसारथ्य, (२) दुग्धदोहविकार, (३) गतिशिक्षा, (४) पल्याणक्रिया, (५) पशुचर्मांगनिर्हार व (६) चर्ममार्दवक्रिया या सहा कला प्रमुख आहेत. गजाश्वसारथ्य यांत हत्ती, घोडे, उंट, गाढव, सांबर, रोही वगैरे जनावरें गाडी वगैरेंस कशीं जोडावीं व हाकावीं हें सांगितलें आहे. दुग्धदोहविकार यांत गाई, म्हशी, बकऱ्या, मेंढ्या, उंट, घोडे, गाढव यांचें दूध काढून त्याचा खवा, दहीं, लोणी, तूप वगैरे करण्याची माहिती आहे. गतिशिक्षा यांत जनावरांच्या पाठीवर बसून त्यांना निरनिराळ्या चाली शिकविण्याची माहिती आहे. सर्कसचीं कामें या गतिशिक्षेंत येतात. पल्याणक्रिया म्हणजे निरनिराळ्या जनावरांवर स्वारी वगैरे करण्यासाठीं योग्य तऱ्हेचें खोगीर करण्याची कला होय. पशुचर्मांगनिर्हार म्हणजे गुरांची कातडीं काढून तीं कमावणें; चर्ममार्दवक्रिया म्हणजे हीं कातडीं विशिष्ट कामांसाठीं विशिष्ट प्रकारें तयार करणें होय. साधें चामडें बसण्यापांघरण्यासाठीं कमावणें निराळें व तेंच जोडा, कवच, ढाल, लगाम, पट्टा, खोगीर वगैरेंसाठीं लवचीक, अभेद्य, कठीण, रेशमी दोरीसारखें, ताठ वगैरे करणें निराळें आहे.

मनुष्यविद्येंत (१) क्षुरकर्म, (२) कंचुकादिसीवन, (३) गृहभांडादिमार्जन, (४) वस्त्रसंमार्जन, (५) मनोनुकूल सेवा, (६) नानादेशीय वर्णलेखन, (७) शिशुसंरक्षण, (८) सुयुक्तताडन, (९) शय्यास्तरण, (१०) पुष्पादिग्रथन व (११) अन्नपाचन अशा अकरा प्रमुख कला आहेत. यांत क्षुरकर्मकलेंत हजामत करणें, निरनिराळ्या प्रकारची केसांची ठेवण, अंग रगडणें वगैरे गोष्टी येतात. कंचु-

कादि सेवनांत नाना प्रकारचे कपडे वेतण्याची व शिवण्याची माहिती आहे. गृह-भांडादिमार्जन यांत जमीन, भिंती सारवणें, भांडीं घांसणें, निरनिराळ्या सामानाच्या निरनिराळ्या वस्तु स्वच्छ करण्याची माहिती आहे. वस्त्रसंमार्जन यांत कपडे धुण्याची व रंगविण्याची माहिती आहे. मनोनुकूलसेवा यांत कोणत्या माणसाला काय आवडत असावें हें कसें ओळखावें व तें त्याला कसें पुरवावें हें सांगितलें आहे. नानादेशीय वर्णलेखन यांत नाना प्रकारचीं, नाना भाषांचीं अक्षरें कोरणें, व लिहिणें यांची माहिती आहे. शिशुसंरक्षण यांत पोरें कशीं संभाळावीं व जोपासावीं हें दाईचें काम सांगितलें आहे. सुयुक्तताडन यांत कोणती चूक कोणत्या कारणानें होते व हा दोष कोणत्या उपायानें जाईल हें सांगितलें आहे. शय्यास्तरण यांत गादी, तक्या, लेप, रजई वगैरे तयार करणें व हांतरणें यांची माहिती येते. पुष्पादिग्रथनांत माळा, हार, मुंडावळी, तुरे वगैरे फुलांच्या वस्तु कशा कराव्या ही माहिती आहे. अन्नपाचन यांत कोणत्या वस्तूंचे कोणते धर्म, त्यांत माणसाला अहितकर कोणते, या अहितकरांचा दोष कसा घालवावा, कोणत्या पक्वान्नांत कोणता मसाला कशासाठीं घालावा, कोणत्या हेतूसाठीं कोणतें अन्न, कसें तयार करावें व कसें खावें वगैरे उपयुक्त माहिती आहे. याप्रमाणें माणसांच्या अनेक सुखसोईंचा विचार मनुष्यविद्येंत केलेला आहे.

वरील विवेचनाच्या रूपरेषेवरून हिंदु कृषिशास्त्र हें इंग्रजी Agriculture पेक्षां किती भिन्न आहे व सामान्य शेतीशिवाय यांत किती उपयुक्त व कितीतरी जास्त गोष्टींचा विचार केला आहे हें समजेल. आपल्या देशांतील नानाविध चालीरीतींचा व आचार विचारांचा उलगडा हें शास्त्र शिकल्यानें होतो. आपल्या पूर्वजांनीं अनेक अनुभव घेऊन चांगल्या गोष्टींचा संग्रह आपल्या नित्याच्या वागणुकींत केला आहे. हें पाहून आपणांस त्यांच्याबद्दल मोठें कौतुक वाटतें व आज आपण पाश्चात्यांचें अनुकरण किती आंधळेपणानें विचार न करतां करीत आहोंत याची लाजहि वाटते. आजचे न्हावी न्हावीपुराण तयार करून आम्ही ब्रह्मदेवाच्या अमक्या अवयवापासून झालों व म्हणून इतके श्रेष्ठ असें म्हणतात परंतु त्यांचा वडिलोपार्जित धंदा दिवसेंदिवस कसा सुटत चालला आहे इकडे त्यांचें लक्ष नाहीं. आंग रगडणें, हाडें बसविणें, चिरफाड करणे हे त्यांचे धंदे कोणाचे ताब्यांत आहेत? वाद्यें वाजविणे वगैरे गोष्टींत तरी त्यांचें प्राविण्य आज कोठें आहे! धोंगटींत, लोकरींत वस्तरा ठेवला म्हणजे काय होतें? हजामतीला कुंजलीनें पाणी न लावतां हातानें कां लावावें, आपली हजामत ज्यानें त्यानें स्वतःच कां करूं नये वगैरे गोष्टींची माहिती त्यांस नाहींशी झाली. त्यांच्या क्षुर-कर्माच्या पोथ्या कोठें आहेत व या पोथ्यांचा अभ्यास न्हाव्यांनीं सोडणें चांगलें काय! याचा विचार नाहीं. जी गोष्ट न्हाव्यांची तीच इतर अठरा कारखान्यांची. ब्राह्मणांना सुद्धां आपल्या मुंज लग्न वगैरे मंगल कार्यांतील गोष्टींची माहिती नाहीं. मातृभोजन म्हणजे काय, अक्षता टाकणें म्हणजे काय, रुखवत कशासाठीं, घास देणें कशासाठीं, व विड्या तोडणें कशासाठीं; नाकांत दूर्वांचा रस कां पिळतात व डोहाळे कां व कसे

पुरवावे याची माहिती कोणाला आहे? तात्पर्य सगळेंच हिंदुस्थान आपल्या जुन्या ग्रंथांना पारखें झाल्यामुळें त्याची दिशाभूल होत आहे. तुमचे वाडवडील मूर्ख होते म्हणून ऐकल्यावर सुद्धां एकहि जण आपले जुने ग्रंथ पाहून व विचार करून आपण मूर्ख का आपले वाडवडील मूर्ख हें तपासून पहात नाहीं. किंवा यांत आश्चर्य तरी कसलें!

विनाशकाले विपरीतबुद्धिः।

विनाशकाल आला असतां मोठमोठ्यांना सुद्धां अशी विपरीत बुद्धि होत असते. प्रभु श्रीरामचंद्रांना सोन्याचा मृग पाहून मोह उत्पन्न झाला, मग इतरांची कथा काय? परंतु आतां तरी जागे व्हा, आपल्या घरचे जुने ग्रंथ बाहेर काढा, वाचून पहा, त्यांचा विचार करा म्हणजे आपण जें आजवर करीत आलों तेंच बरोबर आहे असें दिसेल. परिस्थिति बदलली म्हणून ओरड व्यर्थ आहे. परिस्थिति कांहीं बदललेली नाहीं. उन्हानें कपडे भिजतात व पाण्यानें ते पेटतात असें झालेलें नाहीं. लोखंड, लाकूड, माती यांचे गुणधर्म बदललेले नाहींत. तुम्ही स्वतः बदललां आहांत परंतु ती सुधारणा तुमची तुम्हांस करतां येईल व ती तुम्ही केलीत कीं सर्व सुरळीत झालें. आपण डोळे मिटून "मला दिसत नाहीं परिस्थिति बदलली" असें म्हणण्यासारखें हें आहे. ही परिस्थिति तुम्हांला बदलतां येते व ती तुम्हीच बदलली पाहिजे. असो. पुढील अंकांत एक एका विद्येचें सविस्तर विवेचन करण्यांत येईल असें सांगून ही प्रस्तावना संपवितों.

---

# परदेशी तेल्यांची लग्नपद्धति

( ले०--ना. गो. चापेकर )

लग्न लागण्यापूर्वी सोयरीक जमवितात तो प्रकार असा:—मुलाची मंडळी मुलीच्या मामाकडे अगर आत्याकडे जाते. तेथें बाजारांतून दोन बुंदीचे अगर रव्याचे लाडू विकत आणून ते ताटांत फोडतात. फोडतांना "बालाजी महाराज की जय" असें म्हणतात. "लड्डू फुटा" म्हणजे सोयरीक झाली. लाडू फोडण्याला "सगई" म्हणजे सोयरीक म्हणतात. फुटलेला लाडू गाईला खाऊं घालतात. लाडू फोडल्यावर मंडळींत पेढे वाटतात. हा सर्व खर्च मुलाचा बापच करितो. हा 'बालाजीचा लाडू' असें समजतात. बाळाजी हा या तेली जातीचा देव आहे. जालन्याजवळच्या देऊळ गांवीं ह्या देवाचें स्थान आहे. लग्नाच्या अगोदर दहा दहा वर्षे सुद्धां सोयरीक करून ठेवितात.

लड्डू फुटल्यानंतर 'चढवणी' होते. त्याकरतां कपडेलत्ते, दागिने घेऊन मुलाकडील माणसें वाजतगाजत मुलीकडे संध्याकाळीं जातात. तेथें जातीचे पंच जमतात. मुलीला बरोबर आणलेला पोषाख व दागिने घालतात. नंतर मुलीच्या हातांत सव्वा रुपया व खाऊचा पुडा देऊन नवऱ्याकडचे नातेवाईक बत्ताशांच्या पुड्यांनीं मुलीची ओटी भरतात. नंतर मुलीच्या तोंडांत बत्तासा देऊन, मुलीवरून दिडकी ओवाळून न्हाविणीला देतात. पुढें मुलामुलींचे वडील पेढे वाटतात. मात्र मुलाकडील पेढे मुलीकडील पेढयांच्या दुप्पट असावे लागतात. 'चढवणी' म्हणजे मुलीवर वस्त्रालंकार घालणें.

चढवणी झाल्यावर कित्येक दिवसांनीं अगर महिन्यांनीं सुद्धां परंतु लग्नाच्या पूर्वी मुलाच्या बापाला मुलीचा बाप सांगेल त्या त्या ठिकाणीं व त्या त्या इसमांना रुपये पाठवावे लागतात. साधारणत: अडीच, पांच, दहा अशा ह्या रकमा असतात. ज्याच्याकडे रुपये जातात तो आपल्या घरीं जात जमवतो आणि आलेल्या पैशांचे पेढे घेऊन वाटतो. ह्याला बैठक, कनसुनई व पुच्छापताई असें म्हणतात.

मुलीच्या कुटुंबांतील वडील माणसाकडे मुलाचा बाप सव्वा रुपया घेऊन जातो. याला 'भ्यावपुछाई' म्हणतात. तेथें गेल्यावर मुलाचा बाप विचारतो "भ्याव देते ना?" "हम् देनेकू कबूल है" हें त्याला उत्तर मिळतें.

मुलीच्या गांवीं लग्न होतें. तेथें मुलाचा जानोसा जातो. आरंभीं संध्याकाळीं नवरामुलगा पोषाख चढवून ( ह्या वेळीं बाशिंग नसतें ) गांवांतील मंडळींना बरोबर घेऊन नवरीकडे जातो. ह्या समारंभास 'लग्नप्याला' म्हणतात. या वेळीं ब्राह्मण दोन कागद घेऊन

एकावर नवरीमुलगी, तिचे आईबाप व आजाआजी यांचीं नांवें व गोत्रें लिहितो. दुसऱ्या कागदावर नवरामुलगा त्याचे आईबाप व आजाआजी यांचीं नांवें गोत्रांसकट लिहितो. तसेंच पुढें हळद, लग्न, वरात वगैरे कार्यक्रम विस्तारानें लिहिला जातो. ह्या कागदांवर सह्या नसतात. ब्राह्मण लिहिण्यास सुरवात करतो तेव्हां त्याच्या लेखणीला नवरामुलगा नुसता हात लावतो. हे दोन कागद पुस्तकाच्या आकाराचे करून दोन ताटांत ठेवितात. त्यांना हळदीचीं व कुंकवाचीं बोटें लावून भोंवतालीं कच्चें सूत गुंडाळतात. या कागदांस 'लगून' म्हणतात. जातीचे लोक जमतात त्यांस रुपये द्यावे लागतात. नवरी देईल त्याच्या दुप्पट नवरा देतो. पुढें मुलीची बहीण नवऱ्यामुलाला घरांत घेऊन जाते. जी वहीण लग्न झालेली असेल तिच्याकडे हें काम येतें. हिला 'सवाशीण' म्हणतात व तिच्या नवऱ्याला 'सवासा' म्हणतात. लग्न ठरलें म्हणजे सवासा– सवाशीण नेमावीं लागतात. नवऱ्याला बाशिंग बांधणें, गंध लावणें, कपडे नेसविणें, हळद लावणें, स्नानास पाणी आणणें वगैरे लग्नांतील कामें सवासा–सवाशणीनेंच करावयाचीं असतात. असो. नवरामुलगा घरांत गेल्यावर त्याला दूधभात साखर खाण्यास देतात. सवाशीण त्याचा हात धुते. मग त्याला उपरणें देतात आणि त्याच्या हातांत आंगठी घालतात. याशिवाय एक बत्ताशाचा पुडा व एक रुपया एक आणा नवऱ्यामुलाला द्यावा लागतो. या सवाशिणीच्या मागून नवरीकडील इतर आप्तमंडळी मुलाला बत्ताशांचा पुडा देते. मग सर्वांस नमस्कार करून मुलगा बाहेर पुरुष–मंडळींत येऊन बसतो. मुलगा ओटीवर गेल्यावर नवऱ्यामुलाची बहीण मुलीला घरांत बायका जमलेल्या असतात तेथें आणते. तेथें तिची ओटी भरतात. नवऱ्यामुला-कडचे आलेले कपडे मुलीला देतात. नवऱ्यामुलाप्रमाणेंच एक रुपया एक आणा व बत्तासेहि मुलीला देण्यांत येतात. रात्रभर गाणें-बजावणें चालतें. पहाटेस मुलगा वाजत गाजत परत आपल्या घरीं जातो. जातांना नवरीचा कागद नवरामुलगा घेऊन जातो. नवऱ्यामुलाचा कागद नवरीकडे राहतो. घरीं पोंचल्यावर ओटीवर मुलीचा मामा मुलाच्या मामाला दूध पिण्यास देतो. ह्या दुधाच्या पेल्यांत आठ आणे टाकलेले असतात. ह्या-नंतर मुलीकडले दुसरे मानकरी मुलाकडल्या मानकऱ्यांना असेंच दूध पिण्यास देतात. अखेरीस नवरीचा बाप नवऱ्यामुलाच्या बापाला दूध देतो.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उभय पक्षाकडे सवाशणी जेऊं घालतात. सवाशणीं-बरोबर जातीच्या इतर बायकाहि जेवतात. जेवण आटोपल्यावर नवरा मुलगा स्त्रियां-समवेत शीतला देवीच्या दर्शनास जातो. तेथें देवीला तेल लावतात व तिची पूजा करितात. दर्शन घेऊन परतल्यावर सवाशणी व नवरामुलगा मांडवाबाहेर माती आण-ण्यास जातात. हिला "मनकरणी माती" म्हणतात. त्या जागेवर नारळ फोडतात, होम करतात तसेंच 'खूट' ( नैवेद्य ) ठेवितात. नवरामुलगा पाया पडतो. पुजलेली माती सवाशा खणतो. ती सवाशणी टोपल्यांत भरून घरीं आणतात. तेथें पांच मुली पाण्यानें ती माती भिजवितात आणि तिच्या पांच चुली व दोन लहान ताटें ( ताटेल्या ) कर-

तात. इतकें झाल्यावर मुलाला तेल चढविण्यांत येतें. यावेळीं मुलगा जें वस्त्र नेसला असेल तें आंघोळ होईपर्यंत बदलावयाचें नसतें; नवऱ्या मुलाला तेल लावण्याचें काम अर्थातच पांच सवाशणी करतात. तेल खालून वर चढवितात. दोन हातांचे आंगठे तेलांत बुडवून प्रथम मुलाच्या पायांना नंतर गुढग्यांना, नंतर मणगटांना, कोंपरांना, खांद्यांना व शेवटीं डोक्याला तेल लावण्यांत येतें. एका सवाशणीनें तेल लावल्यावर दुसरी लावते. याप्रमाणें पांच मुली तेल लावतात त्यांचा अनुक्रम लग्न पुस्तकांत लिहिलेला असतो व तें पुस्तक तेल लावतांना मुलाच्या हातांत असतें. मुलगा आंब्याच्या फळीच्या पाटावर बसतो. मात्र तो मांडी घालून बसत नाहीं. हें कृत्य सायंकाळीं होतें. यानंतर मुलाची वहीण तेल व कपडे घेऊन मुलीकडे जाते आणि तेथें तिला तेल लावण्यांत येतें. कपडे खारव्याचे असतात ते मुलीला नेसावयास देतात आणि त्यांच्यावर हळद लावतात. मुलीचें तेल लावणेंहि मुलगी शीतला देवीचें दर्शन घेऊन आल्यावरच होतें.

तिसऱ्या दिवशीं 'मंडवारीसाण्या'चें पाचारण करितात. म्हणजे जातीचे पंच येऊन ते मांडव स्थापना करितात. दोन आंब्याचे खांब सुताराकडून तयार करितात. एक मुलीकरितां व दुसरा मुलाकरितां. खांब सव्वाहात उंच असावा लागतो. तो टेबलाच्या खुरासारखा असतो. मुलाच्या खांबाला पांच अगर सात करकोचे असावे लागतात. मुलीच्या खांबाला दोन करकोचे अधिक असतात. मांडवाच्या मधोमध खांब पुरतात आणि तो नवऱ्या मुलाच्या बहिणीच्या नवऱ्यानें पुरावा लागतो. ह्या मेहुण्याला सवासा म्हणतात. ह्या कामगिरीबद्दल त्याला सव्वा आणा मानाचा मिळतो. यालाच 'मंडवारी' असें म्हणतात. खांब पुरल्यावर नवरेमुलाला हळद लावतात. बायकांनीं हळद लावल्यावर पुरुष एकमेकांच्या अंगावर हळदीचे पंजे उठवितात. नंतर जात-जेवण होतें. जेवणानंतर मुलीचा खांब, टहाळे, आणि उष्टी हळद घेऊन मुलीकडे पुरुषच जातात. ह्यावेळीं त्यांच्याबरोबर बायका असत नाहींत. सवाशाच्या खांद्यावर घालून हा मुलीचा खांब नेण्यांत येतो. मुलीकडे तिच्या बहिणीचा नवरा खांब मांडवांत पुरतो. नंतर मुलीला हळद लावून मुलाकडून गेलेल्या पुरुषांचें भोजन होतें. एव्हांपासून नवरीकडील नातेवाईक नवऱ्याकडे व नवऱ्याकडील नातेवाईक नवरीकडे जाण्यायेण्याचें बंद होतें.

'लगुनप्याल्या'नंतर पांचवे अगर सातवे दिवशीं लग्न लागलें पाहिजे. दरम्यान मुलामुलीला दररोज दोनतीनदां हळद लावतात. लगुनप्याल्यापासून हळद उतरेपर्यंत नवरी व नवरामुलगा यांचें स्नान होत नाहीं. 'मंडवारी'च्या दुसऱ्या दिवशीं रात्रीं 'बरात' काढतात. त्याच्यापूर्वी नवरानवरींची हळद उतरवून त्यांना स्नान घालितात. हें सर्व बायकांचेंच कृत्य असतें. दोहींकडल्या बायका कुंभाराकडे जाऊन त्याच्या चाकाची पूजा करितात आणि त्याच्या बायकोच्या अंगावर गुलाल उडवितांना कुंभाराकडून प्रत्येक पक्षाची मंडळी सात कलश घेते. ते घेऊन बायका नदीवर किंवा तळ्या-

वर जातात. तेथें जलाची पूजा करितात. नंतर मुली पाण्यानें खेळतात. म्हणजे एक-मेकींच्या अंगावर घागरी ओततात. हा पाण्याचा खेळ खेळल्यावर पाण्यानें कलश भरून नवरीच्या बायका नवरीकडे व नवऱ्यामुलाकडील बायका नवऱ्यामुलाकडे जातात. नंतर नवरामुलगा, त्याचे आईबाप व इतर बायका "पूरका" पुजण्यास जातात. मन-कर्णिकेची माती खणली असेल तेथें जातात. तेथें गेल्यावर त्या जागेची मुलाचे आई-बाप पूजा करितात. पुढें जागा सारवून कणा घालतात व त्यावर रेशमाचें घर उभारतात. कण्यावर शेंदराचा ठिपका बाप टाकतो. पण तो टाकतांना आपल्या मयत बापाचें नांव घेतो. बापानंतर त्याच्याप्रमाणें आजा, पणजा, चुलते, मामेभाऊ, वहिणी वगैरे मृत आप्तांचीं नांवें घेऊन शेंदराची चिमटी ठेवितात. शेंदराचा ठिपका ठेवितांना एकीकडे डंका वाजत असतो. मयत पितरांनंतर चंद्र, सूर्य, समुद्र, सर्प ( शेष नारायण ), विंचू यांचीं नांवें घेऊनहि चिमटीभर शेंदूर ठेवण्यांत येतो. या सर्वांना हें लग्नाचें आमंत्रणच असतें व तसें तोंडानें म्हणतहि असतात. उदाहरणार्थः—

"समुद्र हो बाबा, पहिला नेवता ( बोलावणें ) ले; चंद्रसूर्य हो बाबा, नेवता लेवो."

ह्या शेंदराच्या ठिपक्यांवर आई रंगविलेला कापूस टाकते. नंतर नारळ फोडून आरती करितात. मुलाची आई घरावर पदर पसरून ठेविते आणि बाप त्या घरावर सोन्याची आंगठी ठेवितो व मातीला असा टोला मारतो कीं ती माती आंगठीसकट मुलाच्या आईनें पसरलेल्या पदरांत जाऊन पडावी. हिला 'पुरक्याची माती' म्हणतात. नंतर ती माती देवकाजवळ नेऊन ठेवितात. नंतर अर्धें तेल व अर्धें पाणी घेऊन एक कलश भरून तो त्या मातीवर ठेवितात. पांच चुली व दोन ताटल्या मांडवांत रांगो-ळीवर रांगेनें मांडतात आणि त्याच्याभोंवतीं सुताचे अकरा फेरे घेऊन त्याची वात बनवितात. ही वात नवरामुलगा वरातीला निघून परत येईपर्यंत तीन दिवस वरील कलशावर जळत असते. हिला 'सुबावत्ती' ( शुभवात ) म्हणतात. सुबावत्ती केल्यावर नवरा–नवरीकडे बायकांचें जेवण होतें. नंतर याच दिवशीं गेरूनें रंगविलेल्या सवाहात फडकीवर हळद लावलेल्या व भिजलेल्या तांदुळाच्या पिठानें नाग, सूर्य, चंद्र, विंचू, समुद्र व ४० पुतळ्या काढतात. या पिठाला आयपण म्हणतात. या नागावर मुलाच्या बापाच्या शेंडीनें दूध घालावयाचें असतें. बाप एका पळीनें आपल्या शेंडीवर दूध ओततो त्यावेळीं पळीला दुसरे चार इसम हात लावतात. या फडकीचें बाशिंगाबरोबर पुढें विसर्जन होतें.

मुलाचा मोह न्हावी करितो आणि मग मुलाचें स्नान होतें. स्नान झाल्यावर सर्वजण वरातीच्या तयारीला लागतात. मुलाला तांबडें पागोटें घालून त्यावर बाशिंग बांधतात. बाशिंगाला 'म्होर' म्हणतात. ताडाच्या आणि शिंदीच्या पाती आणि केळीचीं सोपें वगैरे जिनसांचें केलेलें हें बाशिंग असतें. भिंगाचे आरसे व काचेचे गोळे बसविले म्हणजे हें बाशिंग मुकुटासारखें दिसतें. असल्या बाशिंगाला रु. पंचवीस ते चाळीस

२२६

पर्यंत किंमत पडते. मुलाच्या कपाळाला गंध लावितात, पण तें साधें नसून गंधाची नक्षीच कपाळावर काढलेली दिसते. गंधाला 'खोड' म्हणतात. नंतर घोडयावर बसून मुलाची मिरवणूक काढतात. या मिरवणुकींत मुलीकडील मंडळी सामील होते. मिरवणूक परत घरीं आली कीं मुलाच्या हाताला कांकण बांधतात. आणि जातीला जेवण घालतात. नंतर नवरा मुलगा घोडयावर बसून नवरीच्या मांडवाकडे जाण्यास तयार होतो. तेव्हां त्याच्या हातांत एक छडी व एक बुरडवी पंखा देतात. लगूनप्याल्यापासून मुलाच्या हातांत कट्यार असतेच. मुलगा मुलीच्या मांडवाबाहेर उभा राहतो. मुलाकडील वरात निघाली म्हणजे मुलीच्या अंगावरील हळदीची मळी काढण्यास सुरवात होते. मळी काढून तिचा गोळा बनवितात. तो हातांत घेऊन मुलगी मांडवांत येते. आणि तेथें ती अशी उभी राहते कीं तिला नवऱ्या मुलाचें तोंड दिसावें पण त्याला मात्र मुलीचें तोंड दिसू नये. मुलीच्या हातांत चाकू असनोच. इतक्यांत मुलीची आठवर बहीण मांडवाच्या तोंडाशीं डोक्यावर कलश घेऊन उभी राहते. ह्या कलशांत नवऱ्याचा बाप सव्वा रुपया टाकतो. नंतर नवरीचा बाप मुलाच्या घोडयाचे पाय धुतो, पूजा करितो व नवऱ्याला सव्वा रुपया देतो. तेथें मुलाला जातीचे लोक पैशाचा आहेर करितात. ह्या आहेराला 'बेवार' म्हणतात. नंतर मुलगा मांडवावर छडी व पंखा फेकतो. आणि मांडवांतून नवरीमुलगी मळीचा गोळा नवऱ्याला मारते. गोळा लागला तर मुलगी नवऱ्याला आपल्या ताब्यांत ठेवील असें समजतात. नंतर मुलीच्या एखाद्या नातेवाईकाच्या घरीं नवरामुलगा व त्याची मंडळी जाऊन तेथें जानोसा देतात. नंतर लौकरच सर्व मंडळी घरोघर जातात. जानोशाच्या घरीं नवरामुलगा व थोडीं मुलें एवढींच राहतात. हा सर्व प्रकार उजाडण्याच्यापूर्वी होतो.

इकडे दुपारीं मुलाकडून मुलीकडे एका कोऱ्या टोपल्यांत पोषाख पाठविलेला असतो, त्यांत पायांतला जोडा असतो हें विशेष आहे. या पोषाखाला 'डळा' म्हणतात. मुलीला स्नान घालून जातीच्या पंचांसमक्ष मुलीला पोषाख दाखवितात. ह्याला 'चढावा' म्हणतात. यावेळीं आईबाप मांडवांत दूधभात घेऊन येतात. तो भात बाप मुलीच्या तोंडाला लावून आईच्या पदरांत टाकतो. नंतर तिघेजण घरांत जातात. कन्यादान होईपर्यंत मुलीचे आईबाप जेवीत नाहींत. मुलाप्रमाणें रात्रीं मुलीचीहि वरात काढतात. त्यावेळीं खोड, बाशिंग वगैरेनें तिला सजविण्यांत येतें. मुलीच्या वरातीचा खर्च नवऱ्यामुलाचा बाप करितो. ह्या वरातीस 'बिन-नायकी' म्हणतात. मिरवणूक येत येत मुलाच्या जानोशाच्या घरासमोर येऊन थांबते. तेथें नवरामुलगा ओटीवरून मुलीचें तोंड पहातो आणि त्याचा बाप बत्ताशाचा पुडा, नारळ व सव्वा रुपया ह्यांनीं मुलीची ओटी भरतो. तेथून मिरवणूक परत घरीं येते. घरीं आल्यावर मुलीच्या हातांत कांकण बांधतात आणि मंडळी जेवते. नंतर जानोशाच्या घरांतून जातीचे पंच मुलास मुलीच्या मांडवाकडे आणतात. तेथें सासू मुलाच्या पायावर पाणी घालते. आणि करंगळींत आंगठी घालते. नंतर ती करंगळी धरून सासूबाई आपल्या भावी जांवयाला मांड-

वांत आणतात. मुलगा पाटावर बसतो आणि ब्राह्मण विवाहांगभूत कर्म करण्यास आरंभ करतो. मुलगा पाटावर बसल्यावर मुलीला मांडवांत आणून त्याच्या उजव्या हाताला शेजारच्या पाटावर बसवितात. ही बसण्याची जागा खांबाच्या समोर असते व उभयतांचें तोंड पूर्वेस असतें. नंतर आईबाप मांडवांत येऊन कन्यादानाचा विधि होतो. मग बाकीची मंडळी आहेर करितात; ह्यालाच 'नातेवाईकांचें कन्यादान' असें म्हणतात. कन्यादानानंतर होम होतो. होम चालू असतां नवरानवरी—नवरी पुढें व नवरा मागें— खांबासभोंवतीं सहा प्रदक्षिणा घालतात. त्यांच्या हातांत लाह्या असतात. एकीकडे मुलीचा भाऊ होमांत लाह्या टाकीत असतो. त्यानें टाकल्या कीं नवरा—नवरीनें टाकावयाच्या, असें करीत प्रदक्षिणा होत असते. त्यावेळीं बायका "लाही दाल भय्या, लाही दाल, मैं तो गौवा परायीं" असें तोंडानें म्हणत असतात.

सहा प्रदक्षिणा झाल्यावर सातव्या प्रदक्षिणेकरितां मुलीच्या आईबापांची परवानगी मागण्यास पंचांना ब्राह्मण सांगतो. त्यावेळीं आईबाप घरांत असतात. मांडवांत नसतात. नवऱ्याकडील मंडळी मांडवांत असते. त्यांना घरांत येण्याचा अधिकार नाहीं. फार काय, मांडवांतच खांबाच्या पलीकडे जातां येत नाहीं. नवरीकडील मंडळी बहुतेक घरांतच असतात. कारण त्यांपैकीं ज्यांनीं कन्यादान केलें असेल त्यांना सातवी प्रदक्षिणा पहावयाची नसते. पंच परवानगी मागण्यास गेले म्हणजे मुलीच्या आईबापांच्या वतीनें मुलाच्या आईबापांस "मुलीचे हाल होणार नाहींत ना!" असें विचारतात. मुलाच्या आईबापांच्या वतीनें "हाल होणार नाहींत" असें कोणीतरी सांगतो. मग आईबापांची परवानगी मिळते. नंतर नवरा—नवरी 'सातवी भोंवरी' (प्रदक्षिणा) घालतात. त्यावेळीं ब्राह्मणानें नवरानवरीची पदरगांठ बांधलेली असतेच. मात्र ह्या वेळीं मुलगा पुढें व मुलगी मागें अशी प्रदक्षिणा होते. इतक्यांत मुलीचा भाऊ घरांत उठून जातो आणि होमांत लाही टाकण्याचें काम ब्राह्मण करितो. ब्राह्मणाच्या मागून नवरा—नवरी अग्नींत लाह्या टाकतात; ह्याला 'ब्रह्मलाही' म्हणतात. सातवी प्रदक्षिणा पुरी झाली कीं लग्न लागलें. सप्तपदी झाल्यावर नवऱ्याच्या डाव्या बाजूला बायको बसते. नंतर खांब व नवरा—नवरी यांच्यामध्यें नवऱ्याच्या मामाच्या शेल्याचा अंतरपाठ धरितात. मग नवरा आपल्या बायकोचा भांग शेंदरानें भरतो. इतकें झालें कीं नवरानवरी जानोशाच्या घरीं चालत जातात आणि कांहीं वेळानें वाजत गाजत परत लग्नमंडपांत येतात. ह्या वेळीं हें जोडपें देवाजवळ बसून एकमेकांस दूधभात भरविते, पुढें बाशिंगें सुटतात आणि जेवणावळ होते. येथें लग्न खलास झालें म्हणून समजावयाचें. रात्रीं नवरा—नवरी नवऱ्याच्या घरीं जातात.

जाण्यापूर्वी नवरा घाण्यांत खुरासणी टाकतो. लग्नांतला खांब हालवतो. मांडवाचा बंद सोडतो. देवक हालवतो. या प्रत्येक कृत्याबद्दल त्याला मानाचा सव्वा आणा मिळतो. नंतर एका कलशांत मुलीची आई सवा आधोली डाळ, तांदूळ आणि सवा रुपाया घालते. मुलाच्या घरीं जातांना हा कलश बरोबर घेऊन जातात. घरीं गेल्यावर

देवकाजवळ नूतन दांपत्य बसतें. तेथें मुलगा खिचडीचें मडकें पायानें लाथाडतो. बायको तें भरतें असें पांच वेळां करतात. मग कोणाचा तरी प्रत्यक्ष मुलगा घेऊन तो खेळ होतो. म्हणजे नवरा 'मला तेल गाळण्यास जायचें आहे' असें म्हणून मुलाला बायकोच्या स्वाधीन करतो. बायको 'मला पाणी भरावयाचें आहे' असें म्हणून नवऱ्याच्या हातांत मुलाला देते. असें पांच वेळां करतात. नंतर मुलगी संसाराचें काम करते. म्हणजे चूल सारवते व इतर कामें करते. यावेळीं नवऱ्याप्रमाणेंच तिला सवाआणा मिळतो. तो तिच्या माहेरचाच असतो. आईकडून आलेली खिचडी शिजवून मुलाकडील गोताला भोजन घालतात. मुलीकडील मंडळी या जेवणांत नसते. दुसऱ्या दिवशीं कांकणें सुटतात. लग्नांत मांसाशन अथवा सुरापान होत नाहीं.

बाशिंग सुटल्यावर बाशिंगें व वर सांगितलेलीं फडकीं एका गाठोड्यांत बांधून तें गाठोडें घरांत जेथें वापर कमी असेल अशा ठिकाणीं टांगून ठेवतात. तें लग्नानंतर येणाऱ्या भाद्रपद शुद्ध ६ स खालीं काढतात. तोंपर्यंत दर महिन्याच्या पौर्णिमेला तन्निमित्त होम करतात. म्हणजे अग्नींत तूप व गूळ टाकतात आणि नैवेद्य दाखवितात. भाद्रपद शु. ६ च्या दिवशीं मोठा नैवेद्य असतो. या नैवेद्यांत पांच शेर कणकेच्या ४० भाकऱ्या व ४० पिठोऱ्या असाव्या लागतात. त्या दिवशीं जातजेवण असतें. सायंकाळीं मोठ्या मिरवणुकीनें तें गाठोडें नदीतळ्यावर नेऊन तेथें त्याचें विसर्जन करतात. या समारंभाला मोरछठ म्हणतात.

---

# लावणी सीतेची

( सं. ना. गो. चापेकर )

नऊ महिने गर्भ कुशीं सीता वनवासी, गेली तातोबाच्या गुंफेशीं

रामानें आज्ञा दिली लक्ष्मणासी, सीता नेली वनवासासी रथाची तयारी झाली मध्यान्ही रात्रीं, शंबकर्णी जोडले त्यासी।

वर बसवली सीतेसी, चालली भयसुर वनासी, नेतो तुझ्या माहेरासी भेटायाला लक्ष्मण बोले सीतेला (१)

सीता रथामधीं जागी उठून झाली लक्ष्मण नाहीं आतां काय करूं मी बाई

आतां काय करूं मी देवा, कोण करील माझा धावा. मी परदेशीं कशी मोकललें वनवासीं (२)

गेली तातोबाच्या गुंफेशी. भडवे पुसती तूं आहे कोणाची कोण

मी रामाची सीता पतिव्रता पहा सत्वें दावीन आतां. ही देवा म्हणून स्मरली, तिनें पंचआरती केली; पांचीगंगा आल्या धावोनी, ऋषी वाल्मीक, तातोबा बोले सीतेसी (३)

नऊ महिने संपूर्ण झाले प्रसूतीच्या वेळा तिथें लहू आकुस जन्मला

हातीं धनुष्यबाण घेतला, बाळ शिकारीला चालला. नको बाळ जाऊं वरच्या रानाला. शिंगीऋषि मारील तुला पातक त्यासी जा कमळें आणायासी (४)

मुद्का दिल्या लिहूनी, दिल्या वांधूनी दिल्या वाटमार्गी लावूनी ।

उदर झालें दारुणी, खंडू म्हणे विठू परमाणे । दुस्मान पळती, वैर्याला शकड घालीती (५)

---

## कथा.

( सं. ना. गो. चापेकर. )

पूर्वी विजयनगरामध्यें एक राजा रहात होता. त्यास तीन मुलगे होते. त्यांपैकीं दोघे आवडतीचे व एक नावडतीचा. आवडतीचे मुलगे ऐषआरामांत दिवस काढीत. नावडतीच्या मुलास निरनिराळीं कामें सांगत असत. नावडतीच्या मुलाचे दिवस असे हालांत जात असत. त्या तीन मुलांचा बाप अंध होता. तेव्हां त्यास एका ऋषीनें असें सांगितलें कीं 'सोन्याचें झाड, रुप्याचें खोड आणि मोत्यांचीं फळें असें झाड जेव्हां तूं आणशील तेव्हां तुझे डोळे चांगले होतील व तुला दिसावयास लागेल.' तेव्हां त्या राजानें आपल्या तीन मुलांस बोलावून सांगितलें कीं, 'जो सोन्याचें झाड, रुप्याचें खोड आणि मोत्यांचीं फळें असें झाड आणील, त्यास मी माझ्या पाठीमागें ( मी मेल्यानंतर ) राज्यावर बसण्याचा अधिकार मिळेल, असें त्यानें आपल्या मुलांस सांगितलें. तेव्हां तीं मुलें बापास वंदन करून निघालीं. पुढें तीं मुलें अनेक देश व अनेक गांवें फिरलीं तरी त्यांस तें झाड मिळेना. तेव्हां त्या आवडतीच्या मुलांनीं नावडतीच्या मुलास सांगितलें कीं आम्हीं दोघे मिळून एकीकडे जाऊं व तूं दुसरीकडे जा. तेव्हां जो नावडतीचा मुलगा होता त्यानें एका अरण्याचा मार्ग स्वीकारिला व ते दोघे मुलगे एका नगरामध्यें गेले. तेथील राजा त्यांचा शत्रू होता. त्यानें त्या मुलांस कैद केलें. तेव्हां ते मुलगे कैदेंत दिवस कंठू लागले. नावडतीचा मुलगा अरण्यांत गेला होता. त्याला त्या अरण्यामध्यें रात्र झाली. तेव्हां तो एका वृक्षाखालीं निजला. तेव्हां जवळच्या एका वृक्षाखालून एक सर्प निघाला व त्यानें आपल्या तोंडांतील हिरा बिळाजवळ टाकून आपण चरावयास निघून गेला. तेव्हां तो हिरा नावडतीच्या मुलानें पाहिला. तेव्हां तो मिळविण्याची खटपट करूं लागला. तेव्हां उजाडण्याची वेळ झाल्यावर तो सर्प आला त्यानें तो हिरा गिळून तो बिळांत गेला. सूर्योदय झाल्यावर नावडतीचा मुलगा एका नगरामध्यें गेला. तेथें एका लोहारास एक पिंजरा अशा तऱ्हेचा करण्यास सांगितला कीं त्याला एकाद्या पदार्थाचा अगर प्राण्याचा धक्का लागतांच त्या प्राण्याचे राई राई तुकडे होतील. त्याप्रमाणें त्या लोहारानें पिंजरा तयार केला. तेव्हां त्या मुलानें त्यास एक लाल दिला व तो पिंजरा घेऊन तो रानांत गेला व जेथें सर्प होता त्या वृक्षावर चढला. पुढें थोडया वेळानें रात्र झाली तेव्हां तो सर्प त्या बिळांतून निघाला आणि तो हिरा तोंडांतून बिळाजवळ टाकून आपण बाहेर निघून गेला. हें त्या मुलानें पाहून पिंजरा दोरीला बांधून

हळूच त्या बिळावर सोडला त्यामुळें हिऱ्यावर आडोसा पडला. त्याबरोबर आपला हिरा घेण्याकरितां कोणी शत्रू आला आहे असें त्याला वाटलें; तेव्हां तो सर्प चवताळून ज्या ठिकाणीं हिरा होता त्या ठिकाणीं आला. त्यानें त्या पिंजऱ्यावर झडप घातली; त्याबरोबर त्या सर्पाचे तुकडे तुकडे झाले. तेव्हां नावडतीचा मुलगा झाडावरून खालीं उतरला व तो हिरा घेऊन तो एका शहराकडे गेला. तेथें त्यानें एक घोडा विकत घेतला व तो घोड्यावर बसून चालला. पुढें त्यास एक तळें लागलें तेथें घोड्याला पाणी पाजण्याकरितां नेलें. तेव्हां त्यानें त्या घोड्याला त्याच्या तोंडाला पाणी लागेपर्यंत नेलें. त्याबरोबर शेष-दूतांनीं घोड्यासह त्याला पाताळांत शेषापुढें नेलें. तो शेषाला पाहून थरथर कांपूं लागला. तेव्हां शेष म्हणाला 'हे राजपुत्रा, तुला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तुझ्याजवळ जो हिरा आहे तो आमच्या हिऱ्यांपैकीं आहे तर तो आमचा आम्हांस दे म्हणजे तुझी एकादी चांगली कामगिरी करून देईन.' तेव्हां राजपुत्र (नावडतीचा मुलगा) म्हणाला 'हा हिरा घ्या व माझी एक कामगिरी करून द्या.' तेव्हां शेष म्हणाला 'तूं जी कामगिरी सांगशील ती करून देतों.' तेव्हां राजपुत्र म्हणाला, माझी कामगिरी अशी आहे कीं, 'मला सोन्याचें झाड, रुप्याचें खोड व मोत्यांचीं फळें असलेलें एक झाड पाहिजे.' ती गोष्ट शेषानें कबूल केली. तेव्हां शेषांनीं राजपुत्राजवळ तीन मुळ्या देऊन सांगितलें कीं, 'पहिली मुळी तोडली कीं, सोन्याचें झाड होईल. दुसरी तोडली कीं, रुप्याचें खोड व तिसरी तोडली कीं, मोत्यांचीं फळें होतील.' असें सांगून राजपुत्राला जमीनीवर पोहोंचतें केलें. पुढें तो राजपुत्र मार्ग क्रमूं लागला. तेव्हां त्याचे सावत्रभाऊ ज्या ठिकाणीं कैदेंत होते त्या ठिकाणीं आला व बंदीखान्यावरील शिपायांस लांच देऊन आपल्या सावत्र भावांची सुटका केली व ते तिघे घराकडे निघाले. वाटेंत नावडतीचा मुलगा आवडतीच्या मुलांना म्हणाला 'आपल्या बाबांनीं सांगितलेलें काम तर झालें,' असें म्हणून त्या मुळ्या आपल्या सावत्र भावांस दाखविल्या. तेव्हां ते म्हणाले 'या मुळ्यांचें तूं काय करणार.' तो म्हणाला 'या मुळ्या तोडल्या कीं आपलें काम होईल.' तेव्हां आवडतीच्या मुलांना काळजी पडली व हा बापाच्या मागें राजा होणार म्हणून त्या दोघांनीं त्याच्याजवळच्या मुळ्या घेऊन त्याला विहिरींत टाकून दिलें व आपण घरीं गेले. तेव्हां घरीं गेल्यावर बापानीं विचारिलें कीं 'माझें काम झालें काय?' ते म्हणाले कीं 'झालें'; व त्यांनीं त्या मुळ्या तोडल्या. त्याबरोबर गांवास आग लागली. त्यामुळें बाप त्यांच्यावर रागावला व त्यानें त्यांस हुसकावून दिलें. पुढें नावडतीचा मुलगा विहिरींतून निघाला व घराकडे येऊं लागला. तेव्हां त्यांची वाटेंत गांठ पडली व त्या दोघांनीं झालेली हकीकत सांगितली. तेव्हां त्या मुळ्या व भाऊ बरोबर घेऊन तो घरीं गेला व त्या नावडतीच्या मुलानें शेषानें सांगितल्याप्रमाणें क्रमानें मुळ्या तोडल्या. त्याबरोबर सोन्याचें झाड, रुप्याचें खोड व मोत्यांचीं फळें झालीं व बापाचे डोळे आले. तेव्हां त्यानें नावडतीच्या मुलास व त्याच्या आईस आवडती केली व मुलाला राज्यावर बसविण्याचा अधिकार दिला.

---

२३१

# स्त्रियांचीं गाणीं

( संग्राहकः — महादेव विनायक डोंगरे )

## मुलींचीं गाणीं

( फुगड्या खेळतांना म्हणावयाचीं )

### १ विहिणीचें प्रस्थ

झुना बाई झुना । झुना घालूं रात्रीं ॥
दिवियाच्या ज्योती । माणकाच्या वाती ॥
राजा बोलवीतो । कंगण्या घडवीतो ॥
आजी तुम्हि बसा । साखरशेले नेसा ॥
हांडा हांडा पाणी । शिंपी शिंपी लोणी ॥
पायाचा वाळा खुळखुळ । नाकाचें मोतीं झुळझुळ ॥
चलाहो विहीणी नाह्याला ॥
काळा गोटा । निळा गोटा । पदरीं बांधला सागरगोटा ॥
विहिणीबाईचा ठमकाराच मोठा ॥

### २ संसार

काळी चंद्रकळा नेसूं कशी । पायीं गोल्हारे चालूं कशी ॥
पळीभर तेल आणलं । त्यांत सासूबाईंचं नह्याणं झालं ॥
वनसांची वेणी झाली । भावजींची शेंडी झाली ॥
उरलें तेल झांकुन ठेवलं । मांजर आलं । लवंडून गेलं ।
कुत्रं आलं चाटून गेलं ॥
वेशीबाहेर ओघळ गेला ! । वेशीचा वेसकर वाहून गेला ! ॥
तिकडून आला पाटील । भले ग नंदे तूझाच संसार !

[ संसाराला सुरवात सुद्धां न केलेल्या अजाण बालिकांना संसाराच्या सत्य-स्वरूपाच्या अज्ञानामुळें त्याचा असा विनोद करण्याची इच्छा होणें साहजिकच आहे. अशी एकमेकींच्या संसाराची थट्टामस्करी करण्याची प्रवृत्ति किती स्त्रियांमध्यें पुढील आयुष्यांत टिकत असेल ? म्हणूनच बाळपणीं लग्न झालेल्या मुलींना पहिलीं पांच वर्षें अशा बिनजबाबदारीच्या व बालिशपणाला शोभेशा खेळकर विनोदांत घालवितां येत असत. ]

### ३ सासर माहेर

सईबाईचा कोंबडा । आला माझ्या दारीं
फोडीन मोती । घालीन चारा । हाकलीन वारा ।
विल मोगरा । विल मोगरा ॥
विलाचे वाटे । सागरगोटे ॥
सासरीं जातां कुच कुच कांटे । माहेरीं जातां हरीख वाटे ॥

[ मुलींचें माहेराबद्दल सहज प्रेम यांत व्यक्त झालें आहे. ]

### ४ फुगडी

फुगडी खेळूं दणादणा । रुपये मोजूं खणा खणा ।
फुगडी फुल्लेदार । भाई शिलेदार ।
हरभऱ्याचा घाटा । माझ्या फुगडीला ताटा ।
बाभळीची साल । माझा कंबरपट्टा लाल ॥
फुगडी खेळूं दणा दणा ॥

### ५ दिवा

दिव्या दिव्या दिपत्कार कानीं कुंडलें मोतीहार दिव्याला देखून नमस्कार ॥
दिवा जळो देवापाशीं उजेड पडो विष्णूपाशीं[1] माझा नमस्कार सर्व देवांपाशीं ॥
तिळाचं तेल कापसाची वात दिवा जळो माध्यान्ह रात ॥

[ हें गाणें दररोज सायंकाळीं दिवा लावल्याबरोबर ( देवांजवळ किंवा तुळशी-जवळ ) त्याला नमस्कार करतांना म्हणतात ]

### ६ प्रार्थना

पड पड कुडी धरणीवरी गंगाभागीरथीच्या तीरीं ।
गयेस गमन । प्रयागीं मरण । दाखव काशीविश्वेश्वरा । तूं आपले चरण ॥
[ ही प्रार्थना रात्रीं निजतांना म्हणतात. ]

### ७ प्रार्थना

अस्ती कस्ती काळ भैरव दण्डपाणि कफल्लक ॥

[ असें म्हणून निजल्यास रात्रीं स्वप्नांत वगैरे भय वाटत नाहीं अशी समजूत आहे. ]

### ८ सीतेचें गाणें

माझ्या बा लक्ष्मण दीरा । मला बा नेतोस कोठें ।
तुझ्या ग माहेरच्या वाटे । ही नव्हे माहेरची वाट ।

(१) तुळशीपाशीं असाहि पाठभेद आहे.

पोफळी वन बहू दाट। नारळी बन बहु दाट। आला बा दक्षणी वारा।
आला बा उत्तरी वारा। सिता बा रडे खळखळा।
रामाला पत्र हो धाडा। रथा तूं चाल झरझरा। माझ्या बा लक्ष्मण दीरा।
मला बा नेतोस कोठें॥

### ९ वस फुगडी

एवढी भुई सारवूं। सात खडे मांडू।
एक खडा मोठा। सई आली पोटा।
सईच्या कानीं बुगड्या। आम्ही घालूं फुगड्या॥

### १० बसफुगडी

बस फुगडी बसुंगा। चतुर भुंगा लालुंगा।
एक पाय खोलीतो। सीताराम बोलीतो।

### ११ कोंवडा

जिजीबाईचा कोंवडा। आला माझ्या दारीं।
घालिन चारा। पाजीन पाणी॥

### १२ 'भा ले भा'

भालेभा। खजूरि खा।
दंडावरचि चोळि माझी। गुजरणिबाय् गुजरणिबाय्॥

[ हें गाणें मुली जोड्या करून व एक हात कमरेवर व दुसरा दुसरीच्या खांद्या-वर टाकून मागें पुढें उड्या मारीत म्हणतात. ]

### १३ छडी सडणें

छडी बाई छडी। तांदुळ छडी।
तांदुळ माझे मोत्याचे। मोत्याचे।
भाऊ माझे जेवाचे। जेवाचे।
भावजय माझी नेमाची। नेमाची।
भाजी केली आळवाची। आळवाची।
कुणाला नाहीं कळवायची। कळवायची॥

[ हें गाणें एकीमेकींच्या खांद्यावर हात ठेवून एक हात एकीमेकींच्या पायाला लावीत, तांदुळ सडल्याचा आभिर्भाव करून म्हणतात. ]

### १४ घुमा

नाच ग घुमा। कशि मी नाचुं।
ह्या गाविचा। त्या गाविचा।

माळी[१] नाहीं आला । फुलं नाहींत माला ।
कशि मी नाचूं । नाच ग घुमा ॥

१ येथें सोनार, सुतार, शिंपी वगैरेंचा उल्लेख करतात. हातांत सूप घेऊन नाचत हें गाणें म्हणतात. ]

१५

अरड्यो परड्यो । कापुस परडयो ।
आमची गौर गेली सासऱ्या । दोन भाकरी वाचल्या ॥

[ मंगळागौर पोंचविल्यावर घरीं परत येतांना तोंडांत पाण्याची चूळ घेऊन हें गाणें मनांत म्हणत येतात. ]

---

# स्त्रियांच्या म्हणी

[ मागील अंकावरून पुढें चालू ]

माझ्या भगिनी श्रीमती बाळूताई खानवेलकर यांच्या तोंडून ऐकलेल्या म्हणी.

१२२ आईचा हात, शिळा गोड भात
१२३ आत तशी भाची, खाण तशी माती
१२४ लोकांचें लेणें लाजिरवाणें, आपलें लेणें गोजिरवाणें
१२५ घरांत उष्टी, बाहेर गोष्टी
१२६ कोणाची कोण, पितळेचे होन
१२७ फुकटचें खाई, त्याला स्वस्त महाग कायी ?
१२८ आधींच हाऊस, त्यांत पाऊस
१२९ ज्याचा माल त्याचे हाल, कोल्हीं कुत्रीं झालीं लाल
१३० थोडें खाणें लजितीचें, पुष्कळ खाणें फजितीचें
१३१ दुखणें जोराचें, पथ्य शेराचें
१३२ किती केला चाळा, तरी रंग जाईना काळा
१३३ तुम्ही आम्ही एक, कंठाळीला मेख
१३४ अडाण्याचा आला गाडा, त्याला वाटेवरच्या विहिरी काढा
१३५ आपलें नाहीं धड, शेजाऱ्याला कड
१३६ हातीं घेतला फडा ( केरसुणी ) बसणारा वेडा
१३७ तुम्ही आम्ही गोड, तिसऱ्याचा लोड ( लोढणें )
१३८ नाक खाजवलें, नकटें वरमलें
१३९ खिशांत नाहीं पै, मनांत गमजा लई
१४० सहज लीला, तिला कशाला भांग टिळा ?
१४१ दिव्यांत वात, ताटांत हात
१४२ काखेंत खवला, महादेव पावला
१४३ अघटित वार्ता, कोल्हें गेलें तीर्था
१४४ रंधा वाढा, उष्टी काढा
१४५ घरांत नाहीं दाणा, मला सरदार म्हणा
१४६ आई गोड, खाई गोड

नी. शं. नवरे
२३५

## मराठी म्हणी

१ झाकलं माणिक गुण आणीक
२ कां ग बाई अशी, तर शिकलें तुझ्या-पाशीं
३ सवत साहीना लेकरूं होईना
४ आधोरें उपाशीन् जीव टोपल्यापाशीं
५ पुस्तकी शीक नी व्यवहाराची भीक.
६ आधाराला मधार, म्हातारा नवरा कुंकवाला आधार
७ जावा तिथं दावा, सवती तिथं हेवा
८ नवसानं मागितलं अन् मुळीं आलं
९ टिकोबा टिकाई विठोबा रखमाई
१० ज्याची त्याला चोप नाहीं न् शेजा-ऱ्याला झोंप नाहीं
११ गाढव मेलं ओझ्यानं नी शिंगरूं मेलं येरझाऱ्यानं
१२ चट्टीपट्टीचा बोभाटा अन् झिपरीनं मारला झपाटा
१३ हिमटी घेई चिमटा न् भडभडीचा बोभाटा
१४ ठाव ना ठिकाण नी बुधवारचं लगीन
१५ संन्याशाच्या लग्नास शेंडीपासून मुहुर्त
१६ कोरे वावा पडन तर काग बाई ओढन?
१७ घरीं नाहीं दाणान् म्हणे मला कार-भारी म्हणा
१८ डोळ्याला नाहीं आसूं न् मेली सख्खी सासू
१९ जाळाविना कड नाहीं मायेविना रड नाहीं
२० सासरीं शिवरात्र, माहेरीं एकादशी, आजोळीं जावं त वामन द्वादशी
२१ नगाऱ्याची घाई तिथं टिमकी तुझं काई
२२ आधींच बहु बावळी अन् बीचमें खाई भंग
२३ अधोऱ्याचा रिण अवकळ्याची चाकरी (कधीं करूं नये)
२५ साप म्हणूं नये बापडा न् नवरा म्हणूं नये आपला

स. वि. देशपांडे, बडोदें

# व्युत्पत्ति

( ले. प्र. धों. कानिटकर, )

टीप:-सं. = संस्कृत; प्रा० = महाराष्ट्री; शौर० = शौरसेनी; अर्धमा० = अर्धमागधी; म० = मराठी; वर० = वररुचींचा प्राकृत प्रकाश; परि० = परिच्छेद; सू० = सूत्र.

( १ ) अंगलट = शरीराची ठेवण.

( सं. ) अंगयष्टिः = अंगलट्ठी ( प्रा. ) ( यष्टयां लः । वर० २।३२ ) अंगलट्ठी = अंगलट.

( २ ) आइमाइ = पार्शी लोकांतील स्त्रीचें नांव.

( सं. ) आदिमातृ = आइमाइ ( अर्धमा० ).

( ३ ) आलवाण = तांबड्या रंगाचें कापड

आलवर्ण = आलवण्ण = आलवाण. ( न ). गरीब विधवा आलवाण नेसतात. वऱ्हाडांत आल नांवाचे वृक्ष आहेत, त्यांच्या मुळांपासून तांबडा रंग निघतो. तो रंग देऊन तयार केलेलें कापड तें आलवाण.

( ४ ) उंबरा—उमरा.

( सं. ) उदुम्बर = ( प्रा० ) उम्बर = ( म० ) उमरा. ( उदुम्बरे दोर्लोपः। वर० परि० ४।२ ) हेमचंद्र "उम्मरो गृहदेहलिः" असा देशी शब्द देतो; वास्तविक उंबरा हा शब्द देशी नसून तद्भव आहे.

( ५ ) एरंडवण—पुण्याशेजारचें एक खेडें.

( सं. ) एरंडवन. ( प्रा ). एरंडवण.

( ६ ) कटोरा-री-रें = लहान अगर मोठी वाटी.

( सं. ) कटोरं = मातीचें भांडें. तोच शब्द मराठींत तत्सम म्हणून रूढ आहे.

( ७ ) कडेल = रेशमी लुगडें.

( सं ) कट + इल्ल ( इल्ल उल्लस्तु तद्भवे ) = कडिल्ल ( कटिवस्त्रम् ). कडिल्लपासून कडेल हा शब्द बनला व तो भाषेत रूढ आहे. कडिल्ल शब्द 'कर्पूरमंजरींत' येतो.

( ८ ) कण(ण्ह)णें.

कण् = रडणें ( कणति ).

( ९ ) कलकल = अस्पष्ट शब्द, कल्ला.

कल्ल अव्यक्ते शब्दे ( भ्वादिगणः ) ( कलकल कल शब्दें फार केला सुटाया ।)

( १० ) कसवटी = सोन्याचा कस लावण्याचा दगड. ( सराफाजवळ असतो. )

( सं. ) कषपट्टिका = ( प्रा. ) कसवट्टिआ = ( म० ) कसवटी.

( ११ ) कापणें = छेदणें.

( सं. ) क्लृप् = ( प्रा. ) कप्प = ( म० ) कापणें. आपटे यांच्या कोशांत क्लृप् धातूचा कापणें हा अर्थ दिला नाहीं; परंतु मनुस्मृतींत या अर्थानें धातूचा उपयोग केला आहे.

क्लृप्तकेशनखश्मश्रूर्दान्तः शुक्लाम्बरः शुचिः ॥४।३५

( १२ ) कुचकुच = दुसऱ्याला ऐकूं न जाईल असें भाषण.

( सं. ) कूज् अव्यक्ते शब्दे. प्र. गण

( १३ ) कुडावा = संरक्षण.

( सं. ) कुडि = रक्षणे, समर्थ या शब्दाचा उपयोग करितात.

करी संकटीं सेवकाचा कुडावा ।
प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥

( १४ ) कात्याचा पाऊस = कृत्तिका नक्षत्राचा पाऊस.

कात्या हा शब्द मराठे लोकांत रूढ आहे.

कृत्तिका = कत्तिआ = कात्या.

( १५ ) खउर = क्षौर.

( सं. ) क्षौर = ( शौर० ) खउर हाच शब्द मराठे लोकांत रूढ आहे. मृताच्या क्रियेच्या संबंधानें या शब्दाचा उपयोग करितात. मराठे लोक "खउर केलं" असें म्हणतात.

( १६ ) खाकरणें

( सं. ) खात्कृ = घसा साफ करणें.

खात्करोति = खाकरइ = खाकरतो.

( १७ ) खतखोड = जनावराचें व्यंग.

हा शब्द क्षत व खोड या दोन संस्कृत शब्दांपासून बनला आहे. क्षतं = जखम; खोड = लंगडा. क्षत याचें प्राकृत रूप खत. जनावर घेतांना त्याची खतखोड पहावी लागते. मराठ्यांत हा शब्द रूढ आहे.

( १८ ) खोटी = लबाड स्त्री.

( सं. ) खोटिः ( स्त्री. ); यापासूनच मराठींत खोटी हा शब्द आला आहे.

( १९ ) चुटपुटित = अटोपशीर, अल्प.

चुटपुटित हा शब्द चुट्, पुट् या दोन संस्कृत धातूंपासून बनला आहे. पाणिनी दोन्ही धातूंचा अर्थ चुट्, पुट् अल्पीभावे असा देतो. हल्लींचा रूढार्थ धात्वर्थास धरून आहे.

( २० ) धटी = कटिवस्त्र.

धटी हा संस्कृत शब्द आहे; त्याचा अर्थ आपटे यांच्या कोशांत वरीलप्रमाणें

दिला आहे. गणपतीच्या भूपाळींत हा शब्द आढळतो.

कांसें पीतांबराची घटी ।
हातीं मोदकाची वाटी ॥

(२१) नट्टापट्टा (करणें) = मौल्यवान वस्त्रालंकार धारण करणें.

नट्टापट्टा हा शब्द नृत्यप्रवृत्त या शब्दाच्या प्राकृतरूपापासून झाला आहे (नृत्यप्रवृत्त = नट्टपअट्ट). नाटकांत रंगस्थानावर येण्यापूर्वी नट उत्तम वस्त्रालंकार धारण करीत असत. तो वेष पाहूनच ते रंगभूमीवर जात आहेत असें सहज समजत असे. हल्लीं तो अर्थ रूढ नसून वर दिलेला अर्थ रूढ आहे. हा शब्द "कर्पूरमंजरींत" आढळतो.

(२२) पार = (पिंपळाचा)

(सं.) प्राकार = (प्रा०) पाआर = (म०) पार.

(२३) पार करणें = समाप्त करणें.

पार हा दशम गणाचा धातू असोन त्याचा अर्थ कर्मसमाप्तौ असा पाणिनी देतो. या धातूपासूनच मराठींत पार करणें हें क्रियापद आलें आहे.

त्यानें तें काम पार केलें = त्यानें तें समाप्त केलें.

(२४) फांसा—सोंगट्याच्या खेळांतील.

(सं.) पाशक = (प्रा.) फंसअ = (म.) फांसा.

(२५) पेट = खेडेगांवांतील चांडाळ चौकडी.

(सं.) पेटक = (प्रा.) पेटअ = (म.) पेट (पेटकः त्रिषु वृन्देषु-अमरकोश).

(२६) पैलवान = कुस्ती खेळणारा, तालिमबाज.

(सं.) पीलु = (फार्सी) पीलू = (आर्बी) फील् = हत्ती.

पैलवान हा फार्सी शब्द आहे; त्याचा अर्थ हत्तीसारखा पुष्ट. याचे मराठींत पइलवान, पहिलवान असें पर्यायवाचक शब्द आढळतात.

(२७) बाळी = स्त्रियांच्या कानांतील भूषण.

(सं.) बालिका = (प्रा.) बालिआ = (म.) बाळी.

(कर्णभूषा कन्या च बालिका । त्रिकाण्डशेष)

मराठे लोक (पुरुष) कानांत बाळी घालतात; ती बाळीहि बालिका या शब्दापासूनच निघाली आहे. मुलींचे नांव बाळी अगर बाली असतें तेंहि बालिका या शब्दापासूनच निघालें आहे.

(२८) भर (दुखण्याचा).

भर हा तत्सम शब्द आहे. (भरोऽतिशयभारयोः । अमर)

( २९ ) माखन = लोणी.

( सं. ) म्रक्षणं = (शौर.) मक्खण = ( म. गु. हिं.) माखन. दिल्लीकडे लोण्याला माखन म्हणण्याचा प्रचार आहे. इकडे मराठे लोक माखनच म्हणतात. तुकारामाच्या अभंगांत हा शब्द येतो.

( ३० ) मच्छर = माशी.

फार्सीमध्येंहि हाच शब्द याच अर्थाचा वाचक आहे. ( मच्छरदान ). संस्कृत-मध्येंहि मत्सर = माशी असा शब्द आहे. ( मखाग्नौ च महावीरो मक्षिकायांच मत्सरः। त्रिकाण्डशेष ) मत्सर एव मच्छरः ।

( ३१ ) मेढ – मेढी ( मांडवाची ).

( सं. ) मेथिः = ( प्रा. ) मेढी = ( म. ) मेढी – मेढ.

( सं. ) मेठिः = ,, = ,, ,,

खळ्यावर मेढक पुरतात किंवा गुरें बांधण्याकरितां मेढ पुरतात, ते दोन्ही शब्द मेथिः किंवा मेठिः पासूनच निघाले आहेत.

( ३२ ) रोद्द = लिंगाइतांतील एक आडनांव.

( सं. ) रौद्र = ( प्रा. ) रोद्द = ( म. ) रोद्द ( रुद्रस्य इदम् रौद्रम् ). लिंगायत शिवभक्त असतात यामुळें तद्वाचक आडनांव असणें उचितच आहे.

( ३३ ) वेळू = ( कळक ).

( सं. ) वेणुः = ( प्रा. ) वेलू = ( म. ) वेळू.

( ३४ ) वइ = कुंपण.

( सं. ) वृतिः = ( प्रा.) वइ = ( म. ) वइ. मराठे लोकांत विशेषेंकरून हा शब्द रूढ आहे.

( ३५ ) वाट = मार्ग, रस्ता.

वाट हा शुद्ध संस्कृत शब्द आहे. (पथि वास्तुनि वाटः स्यात् । त्रिकाण्डशेष ).

( ३६ ) वठ्या = गलेलठ्ठ आळशी मनुष्य.

वठ् स्थौल्ये भ्वादिगणः । या धातूपासून हा शब्द बनला आहे. बायकांच्या बोलण्यांत " वठ्या, वठोबा " असे शब्द येतात.

( ३७ ) समूद = सर्व.

( सं. ) समस्त = ( प्रा० ) समत्त = ( म० ) समूद. मराठे लोकांच्या बोलण्यांत हा शब्द फार येतो.

( ३८ ) सरशी = कुणब्यांतील स्त्रीनाम.

( सं. ) सरस्वती = ( प्रा० ) सरस्सइ = ( म० ) सरसी-शी. कचित् सरसु असेंहि नांव आढळतें.

( ३९ ) सडक = रस्ता.

संस्कृत सरक = रस्त्यांची रांग. सरकपासून सडक शब्द होणें संभवनीय आहे.

( ४० ) साईचा पाऊस = स्वातीचा पाऊस.

( सं. ) स्वातिः = साइ = ( म० ) साई. मराठे लोक स्वाति नक्षत्राच्या पावसाला साईचा पाऊस म्हणतात.

( ४१ ) सारखा-खी-खें = सदृश.

( सं. ) सदृश = ( शौर० ) सरिक्ख = ( म० ) सरिख—सारख.

( ४२ ) सासुरवाडी.

( सं. ) श्वशुरवाटिका = ( प्रा० ) ससुरवाडिआ = ( म० ) सासुरवाडी.

( ४३ ) हरडई = हिरडा.

( सं. ) हरीतकी = ( प्रा. ) हरडई.

( ४४ ) हेडसावणें

हिडि-अनादरे हेडसावणें म्हणजे अनादर करणें.

( ४५ ) स्तोम = (१) आत्मश्लाघा, (२) अवास्तव स्तुति.

स्तोम श्लाघायां ( चुरादिगण ) असा स्तोम या धातूचा अर्थ पाणिनी देतो. एखादा स्वतःचें स्तोम माजिवतो किंवा लोक एखाद्याचें स्तोम माजिवतात. स्तोम म्हणजे समूह असाहि एक अर्थ आहे व त्या अर्थानें वामनपंडितांनीं त्या शब्दाचा उपयोग केला आहे.

तो **स्तोम** येतां बहु सायकांचा।<br>
झालाचि पार्थ व्यवसाय काचा॥<br>
काचावला वीर पुढें धसेना।<br>
झाली नृपा सर्व भयांध सेना॥ १२॥

भीष्मप्रतिज्ञा.

# हालाच्या गाथासप्तशतींतील देशी शब्द

( लेखकः—प्र. धों. कानिटकर )

(१) अज्जा=ईश्वरसुता.

हा अर्थ कुलबालदेव या टीकाकारानें दिला आहे; अज्जा=श्रीमंताची मुलगी.

(२) ओच्छोदक=वळचणीचें पाणी. (च्छदिप्रांतजलार्थकः)

(२) अडअणाओ=व्यभिचारी स्त्रिया.

हल्लीं 'अडाणी' असा शब्द मराठींत आहे, तो याच शब्दावरून आला असावा. अर्थ मात्र अगदीं बदलला आहे.

(४) अत्ता=सासू, मामी.

( श्वश्रूसंबोधने देशी ); कोठें मामी असाहि अर्थ दिला आहे.

(५) अत्यक्क=आकस्मिक, अद्भुत.

अतर्क ( अस्तर्क ) पासून हा शब्द झाला असावा असें वाटतें; व अर्थहि बरोबर जमतो.

(६) अव्वो=अवो, अहो. (अव्यय).

अव्वो संबुद्धिदुःखयोः—देशी कोश. मराठींत अवो हें अव्यय आहे; अवो येतां जातां उठत बसतां कार्य करितां ॥

वामन.

(७) अह= हा, ही.

अह इति असौ इत्यर्थे देशी.

(८) आणंदवड (आनंदपट)

प्रथमपुष्पवतीवस्त्रम् । प्रथमरजोदर्शने जाते तद्वस्त्रं बंधुभिर्लोकेषु........ प्रदर्श्यते इति देशविशेषे आचारः।

हारावली कोशांत याचा अर्थ 'नवोढावस्त्र' असा दिला आहे.

(९) आम=सत्यम्.

आम इति सेर्ष्यानुमतौ ।

(१०) उप्पंग=समुदाय.

उप्पंगशब्दः देश्यां समूहवचनः ।

(११) उत्फुल्लिका=एक प्रकारचा खेळ. (मुलींचा).

पादोपविष्टानां मुहुः पतनोत्पतनरूपा क्रीडा उत्फुल्लिका इति उच्यते ।

(१२) ओल्लिओ=आर्द्रः—ओलें.

ओलवणें हें क्रियापद मराठींत आहे. उदा० गहूं ओलवणें.

(१३) करमरी=हठहृतमहिला.

(१४) किलिंचिअ=वंशः (कळक)

(१५) कुअण्डो=कुटुम्ब

(१६) कंदोट्ठ=नीलोत्पलम्.

(१७) खल=धान्य मळण्याचें खळें. (धान्यमर्दन स्थान.)

(१८) खुडक्किआ=रोषमूका.

रागानें न बोलतां बसणें; या शब्दापासून मराठींत 'कुढणें' हें क्रियापद आलें आहे; उदा० तो मनांत कुढतो.

(१९) खोक्खा=वानरशब्दः

वानर ओरडतांना जो शब्द करतात तो खोक्खा; त्यावरून‌च मराठींत खोकणें, खोकला हे शब्द आले आहेत.

(२०) गोसे=प्रातः (सकाळीं)

टीकाकारानें हा शब्द देशी म्हणून दिला आहे. अमरकोशांत तो दिला नाहीं; परंतु मेदिनी कोशकार गोस हा शब्द संस्कृत म्हणून देतो. बरेच देशी शब्द त्रिकाण्डशेष, हारावली व मेदिनी या कोशांत संस्कृत म्हणून दिले आहेत; वास्तविक ते देशी शब्द असून अमरकोशांत दिलेले नाहींत. टीकाकार देशी कोशाचा उल्लेख करितात, तो देशी कोश उपलब्ध नाहीं व ज्ञानकोशांत (भाग ११) कोश या शब्दाखालीं कोशकारांनीं त्याची माहिती दिली नाहीं. हेमचंद्रानें मात्र देशीनाममालेंत गाथासप्तशतींतील देशी शब्द देशी म्हणून दिले आहेत.

(२१) चिक्खल्ल=कर्दमः ( चिखल )

कै. राजवाडे यांनीं चिखल शब्दाची व्युत्पत्ति, चुलुकक्षल या शब्दापासून दाखविली आहे; ती उघड नियमाप्रमाणें साधतां येत नाहीं; तथापि चुलुक = दाट चिखल असा अर्थ कोशांत सापडतो; यामुळें कै. राजवाडे यांची सरणी केवळ काल्पनिक नसून, यथार्थ दिसत आहे.

(२२)चिरडी=सिद्धि मिळावी अशी प्रार्थना.

टीकाकार या शब्दाचा अर्थ देतो तोः— चिरडि—यथोक्तार्थकः देशी शब्दः। विनतिं सिद्धिपादिकां सिद्धिरस्तु इत्यादिकां।

(२३) चुलचुला=चुळचुळ.

टीकाकार या शब्दाचा अर्थ उत्कंठा असा देतो व त्याच अर्थाचा द्योतक मराठींतील शब्द चुळचुळ हा आहे.

(२४) चोज्जं=आश्चर्य.

मराठींत चोज हा शब्द यापासूनच आला आहे. 'चोज्ज' हें मूळ संस्कृत शब्द 'चोद्य' याचें प्राकृत रूपांतर आहे, चोद्य शब्दाचा अर्थ मेदिनी कोशांत दिला आहेः—चोद्यं स्यादद्भुते प्रश्ने चोदनार्हे तु वाच्यवत्।

(२५) चंद्रिलः=नापितः

चंद्रिलः पुंसिवास्तूकशाके गर्भे च नापिते।—मेदिनी. पाइअलच्छी नाममालेंत "चंडिल" असा शब्द दिला आहे.

(२६–२७) छिंछई, छेंछई.

या दोन्ही शब्दांचा अर्थ व्यभिचारी स्त्री असा आहे. मराठींत 'शिंचा, शिंचीं' असे शब्द आहेत ते या शब्दांचेच पर्याय असावेत.

(२८) छेप्प=पुच्छ.

छेप्पपासून मराठी शब्द शेंप, शेंपुट झाले असावेत.

(२९) जेक्कारो=जयजयकारा जयजय इत्यादिकः स्तुतयः

जेक्कारो नमस्कारे देशीति क्वचित्। एका प्रतींत 'जोक्कार' असा पाठ आहे; त्याचाहि अर्थ नमस्कार असाच आहे. जोत्कारशब्दो नमस्कारे वर्तते इति कुलबालदेवः। अतिशूद्र 'जोहार' करतात; त्याचाहि अर्थ नमस्कार असाच आहे; तो शब्द, जोत्कार—जोक्कार—जोआर—जोहार अशा परंपरेनें मराठींत आला असावा.

(३०) णडिज्जइ=खेद्यते.

नाडणें, नडवणें हीं क्रियापदें या शब्दापासूनच मराठींत आलीं असावींत.

(३१) तंती=चिंता

मराठी शब्द 'तांत' या शब्दापासून आल्याचें दिसतें.

(३२) ताद्दूर=पाण्याचा भोंवरा (जलावर्तः)

(३२) तुप्प=लिप्त.

वण्णघिअतुप्पमुहिः—वर्णघृतलिप्तमुखी. तुप्प शब्दो देशी लिप्ते वर्तते। हरिद्रादि वर्णप्रधानं घृतं वर्णघृतम्। देशविशेषे रजस्वलामुखं चिह्नार्थं वर्णघृतेन लिप्यते इति आचारः।

(३४) तंबा=गाय.

(३५) दुर्दोली=न सुटणारी गांठ. (दुर्मोच्यो ग्रंथिः)

(३५) दे=हे, अरे.

दे शब्दः संबोधने.

(३७) घणिआ (का)=स्वभार्या.

मराठे लोकांत घरधणी, घरधणीन असे शब्द रूढ आहेत.

(३८) नवरंगकम्=नवें वस्त्र किंवा कुसुंबी वस्त्र.

(३९) पइरिक्क=विजन. (एकांत)

(४०) पक्कलः=गर्विष्ठ तरुण. (दर्पवान् युवा).

(४१) पच्चूह=सूर्य.

(४२) पडोहर=पडघर (पश्चाद्गृहम्)

(४३) पाइडि=प्रावरण.

(४४) पाडी=महिषपोतः

(४५) पीलुकः=शावकः

मराठी शब्द पिलुं, पिल्लु हे या शब्दापासूनच झाले असावे.

(४६) पुप्फुआ=गोवरीचा विस्तव.

करीषाग्निः असा टीकाकार देतो; करीषाग्निः=फोपाटा).

(४७) फलही=कापशीचें झाड.

(४८) भिसण=विखुरणें.

(४९) भोगिनी=ग्रामव्यापारिक स्त्री.

भोगिनी असाहि एक संस्कृत शब्द आहे. त्याचा अर्थ "विहाय महिषींमन्यराजयोषिति भोगिनी" असा मेदिनीकोशकार देतो. अमरकोशांतहि तोच अर्थ दिला आहे.

(५०) भोण्डी=सूकरी.

(५१) भंडनं=कलहः (भांडण)

(५२) मज्झआर=मध्य.

मज्झआर यापासून मराठींत माझार हा शब्द आला आहे:—गृहमध्यें = घरमज्झआरम्मि=घरामाझारीं.

मज्झ= मध्य. यापासून माज, माजीं हे शब्द मराठींत आले आहेतः—गृहमध्यें= घरमज्झम्मि=घरामाजीं. माज=कंबर.

(५३) मडह=स्वल्प.

(५४) महमहइ=महमहायते.

मूळ शब्दाचा अर्थ टीकाकार देतो तोः—अतिसौरभम् उद्वहते। यापासूनच मराठी घमघमीत, घमघमाट हे शब्द वर्णव्यत्यय होऊन झाले आहेत.

(५५) मामि=मातुलानी, श्वश्रू.

मराठे सासूला मामी म्हणतात.

(५६) रहट्टघटिका=घटीयंत्र.

रहाटगाडगें.

(५७) रिंच्छोली=पंक्ति, ओळ.

(५८) रुंद=विस्तीर्ण.

(५९) रंप=कच्छ. (काचा लुगड्याचा).

(६०) लुम्बी=स्तबकः

मराठी लोंबट.

(६०) वा (बा) उल्लकम्=पुत्तलिका.

भावलें (भिंतीवर काढतात तें).

(६२) वाउलिआ=स्वल्प खातिका.

(६३) वालुंकी=कर्कटी (काकडी)

मराठी वाळुक;

(६४) विच्छड्डः=समूह.

(६५) वेण्ट=कापशीचें फळ. (बोंड)

(६६) वेल्लहल=सुंदर

यापासून मराठी शब्द वेल्हाळ झाला आहे.

(६७) वोडही=तरुणी, कुमारी.

कोंकण प्रांतांत वोड्यो, वोडी असे शब्द मुलगा, मुलगी या अर्थाचे प्रचारांत आहेत; ते वोडहो व वोडही या शब्दांपासून झाल्याचें दिसतें.*

(६८) प्रहेणक=वायन.

टीकाकार प्रहेणक याचा अर्थ मोदकादिवायनकं असा देतो. याच अर्थाचा पाहुणकी असा शब्द मराठे लोकांच्या बोलण्यांत येतो; तो शब्द प्रहेणक या शब्दापासूनच निघाला असावा. सासुरवाडीहून जावयाला जो खाऊ येतो त्याला पाहुणकी असें म्हणतात.

(६९) वोडो=दुष्ट.

(७०) शामशबल व्रतविशेष.

टीकाकारानें या व्रताची त्रोटक माहिती दिली आहे ती अशी:—यत्र अग्नौ प्रविश्य जले प्रविश्यते।

(७१) साउली=वस्त्रवाचको देशी शब्दः वस्त्रांचल असाहि अर्थ आहे.

(७२) सिप्पिर=पलाल.

पलाल=कोंडा, भूस.

(७३) संघाटी=युगुलम्.

संघाटिका स्त्रियां युग्मे। मेदिनी.

संघाटीपासून सांगडी, सांगड हे शब्द मराठी भाषेंत आले आहेत.

(७४) हलहलकं=कामौत्सुक्यम्.

मराठी शब्द हळहळ या शब्दापासूनच झाला आहे; परंतु अर्थ बदलला आहे.

(७५) हलफल=कोष्णचिक्कण

सुगंधि जळं असा अर्थ कुलवालदेव टीकाकार देतो.

---

* वो (वों) द्रह = युवा-असा शब्द धनपालाच्या "पाइअलच्छी नाममाला" या प्राकृत कोशांत दिला आहे.

" जुअलो[१] जुआ[२] जुआणो[३] पुअंडओ[४] वोद्रहो[५] तरुणो[६] " ॥१०४॥

१ देशी २ युवा ३ जवान ४ पौगंड ५ कोंकणी "वोड्यों" ६ तरुण.

# व्याकरण-कमिटीचा तृतीय पंथ

( लेखक- गो. कृ. मोडक, पुणें )

प्राथमिक शिक्षण, मार्च १९२९, मध्यें प्रसिद्ध झालेल्या 'व्याकरणाचा नवीन अभ्यासक्रम व योजना' यांवरील आक्षेप.

१ आक्षिप्त गोष्टींचें परिगणन-( क ) मुलगा आंबा खातो, यांतील **आंबा** ही द्वितीया. ( ख ) मला जावयाचें आहे, यांतील **जावयाचें आहे** हें संयुक्त क्रियापद. ( ग ) द्रव्यनामाचा अभाव. ( घ ) अपूर्ण, पूर्ण, रीति ( = आवृत्त ) या काळाच्या पोटभेदांचे पंक्तींत **उद्दिष्ट**-चा अभाव. ( च ) तत्पुरुष, बहुव्रीहि वगैरे समासांचे श्रेणींत मध्यमपदलोपीचा समावेश. ( छ ) प्रयोगाचे बाबतींत अर्थाकडे दृष्टी ठेवावी. ( ज ) रूढीवर शास्त्राची अनिष्ट कुरघोडी. ( झ ) संज्ञारूपें-क्रियापद, साहाय्य, पुल्लिंग.

## वरील गोष्टींचें खंडन

२ (क) मुलगा आंबा खातो. यांतील **आंबा** ही प्रथमा आहे. मुलें परीक्षेला बसतांना, त्यांचा कांहीं एक क्रम ठरलेला असतो; नंतर परीक्षा झाल्यावर त्यांचा गुणानुरूप निराळा क्रम लावण्यांत येतो. हा उत्तरोक्त क्रम पूर्वीच लावून ठेवणें शक्य नाहीं. मुलें जशीं येतील तशीं, किंवा आलेल्या मुलांच्या नांवांच्या वर्णक्रमानें, यादींत घातलीं जातात. कोणता मुलगा गुणानुरूप कितवा असावा, हें अगोदर मुळींच पहात नाहींत. अशीच व्यवस्था व्याकरणांत आहे. नामांचीं रूपें आढळतात तशीं, कांहीं एक क्रमानें-त्यांच्या उपयोगाच्या महत्त्वाच्या मानानें मांडण्यांत येतात. येथें फक्त रूपविकाराचा प्रश्न. नंतर वाक्यांत त्या रूपांचे उपयोग ठरतात. एकच रूप अनेक उपयोगांत आढळतें. उलट अनेक रूपांचेहि कांहीं उपयोग मिळते आढळतात. प्रथम नामांचीं रूपें कांहीं एका क्रमानें लावून, त्यांस संज्ञा देतात; त्यांसच विभक्ती म्हणतात. नंतर अर्थाचा विचार होतो. त्यांत आढळणाऱ्या अर्थांस सामान्यतः कारक म्हणतात. रूप म्हणजे विभक्ती घेऊन, त्याचा उपयोग किंवा कारक ठरवितात. म्हणूनच व्याकरणांत अमुक **विभक्तीचे अमुक अर्थ** अशी व्यवस्था आढळते; अमुक अर्थाच्या अमुक विभक्ती, अशी आढळत नाहीं. तेव्हां अगोदर रूप नंतर अर्थ, प्रथम विभक्ती नंतर कारक, हा क्रम ठरतो.

३ तो दशमीला परत येईल, दशरथानें भरताला राज्य दिलें, भुकेला कोंडा चालतो, **मला** बोरें चावतात, इत्यादि ठिकाणीं ला-प्रत्ययान्त रूप निरनिराळीं कारकें दर्शवितें,-अधिकरण, संप्रदान, प्रयोजन, कर्ता इ०. तरी पण त्या त्या कारकानुसारें विभक्ति-संज्ञा बदलीत नाहींत. ला-प्रत्ययान्त रूप चतुर्थीच मानितात. म्हणजे **रूप ही विभक्ति** हेंच सिद्ध होतें. उलट-तो रात्रीचा जागतो, रात्रीं अंधार असतो, बोटांत आंगठी घालितो, दाराला कडी आहे, इत्यादि ठिकाणीं अधिकरण हाच अर्थ भिन्नभिन्न-प्रत्ययान्त रूपानें व्यक्त केला आहे. तरी पण, अर्थानुरूप सर्व रूपांना एकच विभक्ति न मानितां, त्यांस तत्तत्प्रत्ययानुसार निरनिराळ्या विभक्ती मानितात; षष्ठी, सप्तमी, प्रथमा, चतुर्थी इ०.

४ अर्थावरून म्ह. कारकांवरून विभक्ती मानिल्यास, कारकें-कर्ता, कर्म, करण, कारण, प्रयोजन, संप्रदान, अपादान, अधिकरण व ( केवल ) अभिधेय-अशीं कमींत कमी नऊ असल्यानें,

निदान ( संबोधनाखेरीज ) इतक्या तरी विभक्ती मानाव्या लागतील. पण त्या सातच मानण्यांत येतात. कां ? तर एवढींच जास्तींत जास्ती कोणत्याहि नामाचीं भिन्नभिन्न रूपें संस्कृतांत आढळतात म्हणून. यावरून संस्कृत व्याकरणाच्या आधारेंहि, **रूप म्हणजे विभक्ती** हें सिद्ध होतें. 'भजे शंभोश्चरणयोः' अशा ठिकाणीं चरण जरी कर्म आहे तरी तदनुरूप त्याची विभक्ती द्वितीया न मानितां, षष्ठीच मानितात.

५ इंग्रजींतहि असाच प्रकार आहे. As a poet he is sublimer than me अशा ठिकाणीं, than हें सामान्यतः उभयान्वयी अव्यय गणिलें असूनहि, त्याकरितां me ही प्रथमा न मानितां, ( रूपानुरूप ) द्वितीयाच मानितात. यावरून इंग्रजींतहि विभक्ति-संज्ञा रूपतंत्र आहे, असेंच ठरतें. सारांश, व्याकरणांत **संज्ञा रूपतंत्रच असतात**. आमचें कुटुंब, आमचे वडील आले, इत्यादि ठिकाणीं कुटुंब हा शब्द स्त्रीव्यक्तीचा बोधक असूनहि मागील शब्दाच्या रूपानुसार नपुंसकलिंगी मानितात; वडील हा शब्द अर्थदृष्ट्या एकाच व्यक्तीला लागत असूनहि, मागील-पुढील शब्दांच्या रूपानुरूप अनेकवचनीच मानितात.

६ मुलगा **पिकलेल्या** आंब्याला चुंफितो–या वाक्यांत आंब्याला ही द्वितीया आहे. प्रथमान्य विभक्तीची निशाणी म्हणून त्याच्या मागील विकार्य विशेषणाचें सामान्यरूप झालें आहे. असा प्रकार '**पिकलेला** आंबा खातो ' यांत होत नाहीं. अर्थात् येथें मराठी भाषेनेंच स्वतः प्रथमा व तदन्य विभक्ती यांत भिंत घातलेली दिसते. आकारान्त विशेषणाच्या अविकृत रूपापुढील विभक्ती ती प्रथमा व विकृत रूपापुढील ती द्वितीया.

७ व्याघ्रो वनं प्रविशति, वनं वर्धते–या वाक्यांत पहिल्या ठिकाणीं वनं ही द्वितीया आहे, कारण तें कर्म आहे. दुसऱ्या वाक्यांत ती प्रथमा आहे, कारण तो कर्ता आहे. येथें अर्थावरून विभक्ती ठरते, असें कोणी म्हणेल. पण तो केवळ भ्रम आहे. ग्रामः–ग्रामम् या पुंलिंगी रूपांशीं मेळ राखण्यासाठीं सर्व लिंगांत विभक्ती सारखी असावी, एवढ्यास्तवच–वनम् हें एकच रूप प्रथमा व द्वितीया मानण्यांत येतें. मुळांतच तें दोन विभक्तींचें मानण्यांत येत असल्यानें, विशिष्ट ठिकाणीं त्याच्या अन्यतरत्वाचा निर्णय अर्थानें होतो इतकेंच. मुळांत नसलेली विभक्तिसंज्ञा अर्थानें प्राप्त होत नाहीं. 'प्राशनात् पञ्चगव्यस्य दहत्यग्निरिवेन्धनम्' या पद्यार्धांत जे प्राशनात् असा पाठ घेतात ते प्राशनात् हें नायक आहे म्हणून प्रथमा मानीत नाहींत, तर पंचमी प्रथमास्थानीं योजिली आहे असें म्हणतात. सारांश–अर्थ, मुळांत नसलेली, विभक्ति-संज्ञा रूपास देत नाहीं, तर असलेल्या एकाधिक संज्ञांपैकीं विशिष्ट ठिकाणीं कोणती, एवढेंच सांगतो. अन्यतरत्वनिर्णायकोऽर्थः हें तत्त्व लक्षणीय आहे.

८ वाघाला ही विभक्ति कोण ? असें विचारल्यास अर्थवाद्याच्या मताप्रमाणें–(वाघाला धाववते–कर्ता ) प्रथमा, ( वाघाला पाहतो–कर्म ) द्वितीया, ( वाघाला शंभर रुपये–पडले–प्रयोजन ) चतुर्थी, (वाघाला दगड मारतो– अधिकरण) सप्तमी, अशीं विविध उत्तरें प्राप्त होतील. हें योग्य ठरतें काय ? उलट, वाघ शब्दाची प्रथमा सांगा, असें विचारल्यास **वाघ** (चालतो), **वाघानें** ( शेळी मारिली ), **वाघाला** ( धाववतें ), अशीं उत्तरें वाघ कर्ता असल्यानें प्राप्त होतात, तीं ग्राह्य आहेत काय ? नाहीं. तेव्हां रूप हेंच विभक्ती, हें उघड आहे. फार काय ? अर्थवादीच हें तत्त्व नकळत कबूल करितात. रामानें आंबा खाल्ला–या वाक्यांत आंबा कर्म असूनहि, तें द्वितीया न मानितां प्रथमाच मानितात. कां ? तर प्रयोगाचे उपपत्तीकरितां. तसेंच विशेषणाचे सामान्यरूपाचे उपपत्तीकरितांहि, रामा पिकलेला आंबा खातो, यांतील आंबा ही प्रथमाच मानणें प्राप्त आहे. सारांश– व्याकरणविषयाची प्रतिपादनाची सरणी, संस्कृत इंग्रजी इ० अन्य भाषांची तुलना, मराठी भाषेची प्रवृत्ति, इत्यादि विविध कारणांनीं ' रामा आंबा खातो ' यांतील आंबा ही प्रथमा ठरते.

९ (ख) **मला जावयाचें आहे**–यांतील जावयाचें आहे हें संयुक्त क्रियापद नाहीं. जावयाचें

हें भाववाचक धातुसाधित नाम व आहे हें क्रियापद. मला ही चतुर्थी, अर्थ अधिकरण. पूर्वपक्ष—( संयुक्त क्रियापद मानणारे म्हणणार)-जावयाचें आहे, या दोन शब्दांनीं कोणती क्रिया सांगितली जाते ? जाणें हीच. करितां दोन्ही शब्द मिळून एकच संयुक्त क्रियापद मानावें. असेंच, पत्रें लिहून टाकिलीं—यांतील लिहून टाकिलीं हें संयुक्त क्रियापद मानावें. उत्तरपक्ष-( धातूपासून निघालेल्या ) दोन शब्दांनीं एकच क्रिया दर्शित होत असल्यास,—ते दोनहि शब्द मिळून एक संयुक्त क्रियापद मानावें, असें म्हटल्यास—हत्तींचा कळप, शाळेची इमारत, पुष्करणीचा हौद, माणसांची दाटी, मित्रेपणाची कमाल (= मोठा मित्रेपणा ) इत्यादि पदयोगहि संयुक्त नामें मानावीं लागतील. हत्तींचा कळप म्हणजे हत्तीच, दुसरें काय ? उंट नाहींत, बैल नाहींत, घोडे नाहींत, झाडें नाहींत. पण असें कोणीच मानीत नाहीं; तुम्हीहि मानणार नाहीं. तेव्हां दोन शब्द मिळून एक क्रिया व्यक्त होते म्हणूनच जावयाचें आहे हें संयुक्त क्रियापद ठरत नाहीं.

१० **जावयाचें** हें काय आहे ? मम गन्तव्यमस्ति, I have to go, अशीं भाषांतरें येथें कोणीहि कबूल करील. यांत गन्तव्यं व to *go* हीं नामें आहेत. तर त्यांचाच बरावर मराठी पर्याय असलेलें 'जावयाचें' हेंहि नाम कां नसावें ? वाचण्याचें—वाचावयाचें-**पठित**व्यं पुस्तकम्, a *book to read*, यांतहि धातु सकर्मक असतांनाहि चें—प्रत्ययान्त रूप तव्य प्रत्ययान्ताचा पर्याय होतें. संस्कृतांत गन्तव्यं हें नाम, व पठितव्यं हें विशेषण आहे. हें तव्य-प्रत्ययान्त रूप मूळचें विशेषणच; त्यांतील धातू अकर्मक असल्यास, विशेष्याचे अभावीं त्यास नामपणा प्राप्त होतो. असाच प्रकार मराठींत मानून (अकर्मक) जावयाचें हें नाम कां मानूं नये ? व्रीडितव्यमपि ते सचेतसः,येथें 'व्रीडितव्यम् अस्ति' ( क्रि. ) असा स्पष्ट प्रयोग आहे. अडचण एवढीच कीं ( विशेष्याभावीं) अव्ययासारखें दिसणारें जावयाचें हें नाम कसें मानावें ? मूळचें विशेषण असलेलें शब्दरूप विशेष्याभावीं नाम होणारच. तो **पूर्व दिशेला** गेला, किंवा **पूर्वेला** गेला. येथें **पूर्वेला हें नाम** आहे. अशा रीतीनें जावयाचें आहे, हें संयुक्त क्रियापद नाहीं, असें ठरतें. यांतील जावयाचें हें धातुविशेषण, नामासारखें प्रयुक्त, प्रथमा, **अर्थ कर्ता**, आहे—चा करितां या वाक्यांत भावे प्रयोग मुळींच नाहीं. मला पुस्तक वाचावयाचें आहे—यांतहि तीच स्थिति. पुस्तक **कर्ता**, वाचावयाचें विधिविशेषण, आहे हें क्रियापद, प्रयोग कर्तरि ( अकर्मक ), कर्मणि किंवा भावे नव्हे.

११ संयुक्त क्रियापद कोठें मानावें ? पदसंमर्श ( किंवा parsing )—चें काम कोशापासून वाक्यापर्यंत. कोशांतून शब्द घेऊन तो वाक्यांत योजणें, हें व्याकरणाचें काम. अर्थात् पदसंमर्शामध्यें शब्दाचा विचार होतो तो-शब्दाची जाती, त्यास झालेले रूपविकार ( कांहीं झाले असल्यास ), व त्याचें वाक्यांतील स्थान किंवा शब्दांतरांशीं संबंध. कोशांत धातू सांपडतात; आपण ते धातू घेऊन वाक्यांत त्यांचा उपयोग करतों तो क्रिया दर्शविण्यासाठीं. हा क्रियाशब्द क्रियेबरोबर आणखी माहिती देतो ती रूप, अर्थ, काळ, पुरुष, लिंग, वचन, प्रयोग एवढीच होय. काळामध्यें क्रियेची अवस्था पूर्ण किंवा अपूर्ण इत्यादिकांचाहि विचार होतो. कांहीं क्रियापदें ही माहिती केवळ स्वतःचे रूपावरूनच देतात, कांहींना धात्वंतराची जरूरी असते. **अशा धात्वंतराचे योगानें बनलेलें क्रियापद म्हणजेच संयुक्त क्रियापद होय.**

१२ तो जातो, तो जात नाहीं. येथें पूर्वत्र एका शब्दानें क्रिया सांगितली आहे, तर उत्तरत्र दोन शब्द योजिले आहेत. नाहीं हें पद निराळें क्रियाविशेषण म्हणून घेतां येत नाहीं; कारण तसें घेतल्यास जात यास स्वतंत्र अस्तित्वच नसल्यानें, जात या पदाची व्यवस्था लावितां येत नाहीं. म्हणून जात नाहीं असें जोडपद घ्यावें लागतें. यांत क्रियेचा निषेध केला आहे. अशा रीतीनें क्रियापद रूपावरून भावाभाव दर्शवितें, हें मानणें प्राप्त झाल्यानें ( करण किंवा अकरण ) रूप हा

क्रियापदाचा धर्म ठरला. **गेला** अशा रूपांत भूतकाळ स्पष्टच आहे; ज्यावरून क्रियापदाच्या रूपांत काळ हा धर्म घुसला. 'जातो' यांत जाणें या क्रियेची सामान्य अवस्था आहे, तर 'जात आहे' यांत ती क्रिया अपूर्ण आहे. यामुळें अवस्था हाहि क्रियापदाचा धर्म मानणें प्राप्त होतें; परंतु त्याचा अंतर्भाव काळांतच करितात. क्रियेचे पूर्णत्वादि धर्म काळाचे विशेषणावरून व्यक्त केले जातात. क्रियापदांच्या आज्ञा, विधि इत्यादि कल्पना रूपावरून बोधित होतात. इतर धर्मांची उत्पत्ति वाक्यगत प्रथमान्त पदाचे साधर्म्यानें व बोलणाराचे विवक्षेनें उपपादितां येते. सारांश क्रियापदाला धर्म लागतात ते रूप, अर्थ, काळ, पुरुष इत्यादि. यांपैकीं संयुक्त क्रियापदाचे विचारांत संबंध येतो तो प्रायः अर्थ व काळ यांचा. एका तासांत सारीं पत्रें लिहून टाकिलीं-येथें लिहून टाकिलीं एवढें संयुक्त क्रियापद मानिल्यास, सहाय धातू टाक हा ठरणार. आतां प्रश्न असा कीं टाक धातू क्रियापदाचे कोणते धर्म व्यक्त करितो? काळ कीं अर्थ? टाक हा धातू लिहिण्याच्या अर्थाची किंवा काळाची फोड मुळींच करीत नाहीं; अवस्थाहि दर्शवीत नाहीं; कारण अवस्था दर्शित होते ती धातूचे लिहीत, लिहिला इत्यादि ठरीव धातुसाधितांनीं. त्या अवस्थाहि ठराविकच आहेत. अपूर्ण, पूर्ण, उद्दिष्ट, व रीति (म्ह० आवृत्त). काळ दर्शविला जातो तो धातूस लागलेल्या प्रत्ययांनीं. टाक हा धातू आहे, प्रत्यय नाहीं. करितां सहाय धातूचें कोणतेंहि कार्य 'टाक' करीत नाहीं; त्यावरून लिहून टाकणें हें संयुक्त क्रियापद नाहीं, हें सिद्ध होतें.

१३ पूर्वपक्ष-लिहून टाकिलीं म्हणजे लिह धातूची पूर्णावस्था दर्शित होते. करितां लिहून टाकिलीं हें संयुक्त क्रियापद मानावें.

उत्तरपक्ष-एकप्रकारें पूर्णावस्था दर्शित असली तरी ती व्याकरणांत मानितात ती नव्हे. लिहिलें आहे-हा पूर्ण वर्तमानकाळ मानतात तो कां? तर त्यांनीं लिहिलेल्या क्रियेची पूर्णावस्था दर्शित होते म्हणून. लिहून टाकिलीं म्हणजे 'लिहिलीं आहेत' नव्हे. शिवाय या जोडशब्दांत पत्रें या कर्माशीं संबंध-विच्छेद ही कल्पना आहे. ही कल्पना क्रियापदाचे धर्मांत कोठेंच समाविष्ट झालेली नाहीं. रूप, अर्थ वगैरेमध्यें संबंध-विच्छेद ही गोष्ट मुळींच नाहीं. करितां टाक हा धातू ठरीव धर्मांपैकीं कोणताच व्यक्त करीत नसून, नवीनच एक धर्म व्यक्त करितो, म्हणून तो सहाय धातू होऊं शकत नाहीं. तोच सहाय धातू होय कीं जो अर्थ, काळ वगैरे ठरीव धर्मांपैकीं एखादा धर्म,-याहून इतर कोणताच नव्हे,-प्रस्तुत क्रियेसंबंधानें सूचित करितो. 'लिहीत होता' याशीं लिहीत राहिला,-बसला,-चालला यांची तुलना केल्यास दिसून येईल कीं 'लिहीत होता' यांत लिहिणें या क्रियेची केवळ भूतकालीन अपूर्णावस्था बोधित होते, याहून जास्त कांहींहि बोधित होत नाहीं; तसा प्रकार इतर जोडरूपांचा नाहीं. लिहीत राहिला यांत सातत्य, व लिहीत बसला यांत चिकाटी, लिहीत चालला यांत खंडाचा अभाव-हे भाव **जास्त** व्यक्त होतात. असले आगन्तुक भाव व्यक्त करणें हें सहाय धातूचें काम मुळींच नाहीं. सहाय धातूचें काम नियमित आहे. तें एवढेंच कीं अर्थ व काळ वगैरे धर्मांपैकीं एक वा अनेक धर्म प्रस्तुत क्रियेसंबंधीं सांगणें. याहून इतर कोणत्याहि गोष्टीचा त्यास वासहि येतां कामा नये. करितां लिहून टाकिलीं हें संयुक्त क्रियापद नव्हे.

१४ अन्यभाषांचा दाखला-He kept calling, स आह्वयन्नास्त-तो हाका मारीत राहिला. या सर्व वाक्यांचा अर्थ एकच आहे. हाका मारीत हा जोड शब्द, calling व आह्वयन् यांचा पर्याय आहे. येथें इंग्रजींत किंवा संस्कृतांत संयुक्त क्रियापद मानीत नाहींत. मग मराठींतच तें कोणत्या विचारसरणीनें मानावें? इतर भाषांत येथें क्रिया दोन मानितात. तद्वतच त्या मराठींत कां मानूं नयेत? सारांश-पौरस्त्य व मराठीची प्रभवभूत अशी संस्कृत, व पाश्चात्य, उत्तम कमावलेली, आधुनिक अशी इंग्रजी, या दोन्हीहि भाषा सातत्य ही कल्पना क्रियान्तरोक्त मानितात; तसेंच मराठींत मानून, बोलत

राहिला इत्यादि संयुक्त क्रियापदें न मानितां, राहिला इ० ( केवळ ) साधीं क्रियापदें मानावीं.

१५ (ग) पाक, चित्र (सारखेचें), (एखादें चित्र देवता मानिलेलें=) गौर, या सर्वांत मूळ साखरच आहे. तरी पण गौर हें विशेषनाम, चित्र हें सामान्यनाम, व पाक हें द्रव्यनाम आहे. द्रव्यनाम म्हणजे असें नाम कीं ज्यानें बोधित झालेल्या वस्तूचें परिमाण किंवा प्रमाण नुसत्या संख्यावाचकानें सांगतां येत नाहीं. दहा चित्रें म्हणतां येईल, तर दहा शेर पाक असें म्हणावें लागेल. किती चित्रें? दहा. किती पाक? दहा शेर. अशा रीतीनें ज्याचें परिमाण सांगण्यास संख्यावाचकाबरोबर मापाचे वाचक शब्दाचा प्रयोग करावा लागतो, तद्बोधक नाम द्रव्यनाम समजावें. तें न मानिल्यास, पाक यासारख्या नामाची व्यवस्था काय करणार?

१६ (घ)जात आहे, गेला आहे, जात असतो, जाणार आहे, हीं रूपें एकाच श्रेणींतील आहेत. पहिलीं तीन संयुक्त काळ म्हणून ग्राह्य, तर चौथेंहि तसेंच पाहिजे. करितां जात आहे हा अपूर्ण वर्तमान काळ, तसा **जाणार आहे** हा **उद्दिष्ट** वर्तमानकाळ मानणें जरूर आहे.

(च) समासांत तत्पुरुषाचे पोटांत कर्मधारय, त्याचे पोटांत द्विगु, वगैरे प्रकार आहेत. परंतु उत्तरोक्त दोन्ही प्रकार विशेष महत्त्वाचे व स्वतंत्र दिसणारे असल्यानें, त्यांचें गणन तत्पुरुषाबरोबर केलेलें वेळेस चालेल. पण तत्पुरुष, बहुव्रीहि यांचे पंक्तीस मध्यमपदलोपीस जागा केवळ अशास्त्रीय आहे. असें वर्गीकरण म्हणजे घोडा, बैल, वाघ, मांसजीवि, तृणभक्षक, इत्यादिसारखें होय. तत्पुरुष-बहुव्रीही-मध्यें वर्गीकरण-तत्त्व पदांचा **परस्पर-संबंध** आहे, तर मध्यमपदलोपीमध्यें **लोप** हें निराळेंच तत्त्व आहे. कोणत्याहि वर्गीकरणांत तत्त्व एकच असलें पाहिजे. तसें नसल्यास तें वर्गीकरण वर्गीकरणच नव्हे.

१७ (छ) 'प्रयोगाचे बाबतींत अर्थाकडे दृष्टी ठेवावी'–याचा अर्थ काय? प्रयोग म्हणजे **क्रियापदाचें साधर्म्य**. तें कर्त्याशीं असल्यास, तद्विशिष्ट क्रियापदाचा प्रयोग कर्तरि, कर्माशीं असल्यास, कर्मणि, इत्यादि व्यवस्था व्याकरणांत आहे. येथें अर्थाचा संबंध काय? 'त्यानें स्नान केलें' हा कर्मणि, तर 'तो अंघोळ केला' हा कर्तरि प्रयोग. केलें-चा मिलाफ कर्माशीं म्हणून केलें हा कर्मणि प्रयोग, केला-चा मिलाफ तो-शीं म्ह० कर्त्याशीं, म्हणून केला हा कर्तरि प्रयोग. प्रयोग सर्वांशीं रूपसाधर्म्यावर अवलंबून आहे, त्यांत अर्थाचे विचारास जागाच नाहीं. प्रस्तुत दोन्ही वाक्यांचा अर्थ एकच आहे, तरी पण प्रयोग भिन्न मानणें प्राप्त होतें.

१८ (ज) रूढीवर शास्त्राची अनिष्ट कुरघोडी–मीं घर केलें, ग्रंथ केला, बाग केली, असें बोलणें रूढी आहे, तशीच 'मी आंघोळ केलों' असें बोलणेंहि रूढीच आहे. दोन्ही सारख्याच शिष्टादृत. मग त्यांतील पूर्वोक्त ग्राह्य व उत्तरोक्त अग्राह्य कां? सर्व रूढी सारख्याच सांच्याच्या असल्या पाहिजेत काय? त्यांत भिन्नत्व असूंच नये? इंग्रजींत सर्व धातू Weak conjugation चेच असले पाहिजेत असा आग्रह चालेल काय? बुध्-बोधति असें होतें म्हणून, युध् योधति असें झालें पाहिजे, असा आग्रह कोण कबूल करील? जेवढ्या शिष्टादृत रूढी तेवढ्या प्रमाण मानून व्यवस्था लाविली पाहिजे. रूढींपैकीं कांहींकडे दृष्टी मुळींच न देतां, व्याकरणानें नियम करावे, व सुटलेल्या रूढी त्यांत बसत नाहींत म्हणून त्यांना चूक म्हणावें हा खासा न्याय! शुक्रवारीं शाळा असते म्हणून, Good Friday चे दिवशीं सुद्धां शाळा असलीच पाहिजे, असा आग्रह चालेल काय? ज्या धर्मशास्त्रानें रविवार ही सुटी ठरली, त्याच शास्त्रानें Good Friday ही सुटी ठरली. दोन्ही सुट्या सारख्याच मान्य. तसाच प्रकार रूढीसंबंधानें. त्यांतील माझे नियमांत अमुक रूढी बसत नाहीं, म्हणून ती त्याज्य, असें व्याकरणानें म्हणणें असमंजसपणाचें आहे. अहं एनां विस्मृतः-असें वाक्य 'मया एषा विस्मृता'चे बरोबर प्रशस्त मानितात. तें चूक कोणीच म्हणत नाहीं. हा चूक व अपवादभूत यांतील भेद लक्ष्यांत आणिला पाहिजे. अप-

वादभूत म्हणजे चूक नव्हे. मी आंघोळ केलों-येथें केलों हें रूप कर्तरि आहे. सकर्मक धातूःपन्न असल्यानें तें कर्मणि असावें; पण तें येथें कर्तरि आढळतें हा **अपवाद आहे, प्रमाद नव्हे.** 'तो सगळें अन्न जेवला' असेंच आपण म्हणतों, त्यानें सगळें अन्न जेवलें, असें म्हणत नाहीं. करितां **जेवला** याचेच पंक्तीस बसणारें (आंघोळ) **केला** हें रूपहि शुद्धच मानिलें पाहिजे. सारांश-रूढीवरून नियम करावयाचा, व त्यानेंच रूढी चूक ठरवावयाची हा अन्याय आहे. शिंप्यानें अंगावरून कपडा बेतावा, तो कपडा अंगाला न आल्यास, **अंग चूक** म्हणण्यासारखें आहे. सारांश, रूढी असेल तशी वैयाकरणानें घेतली पाहिजे. तदनुरूप नियम बनविणें, व विशिष्ट रूढीकरितां अपवाद मानणें, हेंच व्याकरणाचें काम आहे.

१९ (झ) नाम, सर्वनाम, विशेषण यांचे श्रेणींत धातू हा शब्द पाहिजे, क्रियापद नको. राम-**ची** रामास ही (विभक्तिपद) विभक्ति; तसें **जा** हा धातू, **जातो** हें क्रियापद. इंग्रजींत धातू व क्रियापद यांचे रूपांत बहुधा फरक नसल्यानें, तेथें एकाच संज्ञेनें काम भागतें; तसें मराठींत भागावयाचें नाहीं.

**तो जात आहे** यांत आहे हें **सहाय** क्रियापद आहे. (सह-इ किंवा अय् =) सहाय = बरोबर येतें तें. अर्थात् येथें अस-सारख्या धातूंस सहाय धातू म्हटलें पाहिजे; साहाय्य हें भाववाचक नाम वापरणें योग्य नाहीं.

पुँल्लिङ्ग किंवा पुंलिङ्ग असें संस्कृतांत रूप आहे. मराठीचे अनुस्वार-लेखनानुस्वार यांत जरूर तो फरक केल्यास मराठींत वरीलप्रमाणें पुँल्लिंग किंवा पुंलिंग अशीं रूपें होतील, पण पुल्लिंग असें होणार नाहीं; करितां तें त्याज्य मानावें.

२० याप्रमाणें मुख्य असे मतभेद येथें नमूद केले आहेत. त्याचा शाळाखात्यानें व विद्वानांनीं अवश्य विचार करावा; व सोपेपणाकरितां म्हणून शास्त्रीय शुद्धतेचा बळी देऊं नये. खरें पाहिल्यास शास्त्रशुद्धता व सोपेपणा यांत विरोध मुळींच नाहीं, असेंच दिसून येईल. व्याकरणासारख्या शब्द-रूपप्रधान विषयांत अर्थाला नसतेंच महत्त्व सर्वत्र देत सुटल्यानें 'मूले कुठारः' अशीच आपत्ति प्राप्त होते.

---

## बैलगाडीचा अवयव 'ढकली' यासंबंधानें

१ उतारावरून गाडी फार वेगानें घसरत जाऊं नये, अशाकरितां तिला रोधक म्हणून चाकांच्या मागें आडवें बांधलेलें लाकूड, असा ढकली-चा अर्थ आपले मागील अंकीं दिला आहे. याचाच पर्याय म्हणून **घसण** हा शब्दहि रूढ आहे. गतीचा रोध चाकाशीं या लाकडाच्या होणाऱ्या **घर्षणानें** होत असल्यानें, घसण हाच शब्द जास्त समर्पक दिसतो; करितां त्याची नोंद आपण अवश्य करावी, शिवाय—

२ बैल मागें सरल्यास, त्यांस चाकें लागतील, तीं लागूं नयेत म्हणून, साटीचे खालींच पुढल्या बाजूस बांधलेलें आडवें लाकूड असतें; तें बैलांस चाकापासून पुढें **ढकलितें**; यास **ढकली** अशी संज्ञा आहेच, व ती कार्यानुरूपच आहे. करितां मागील लाकडास घसण व पुढल्यास ढकली असाच शब्दविभाग योग्य ठरतो. 'ढकली' अशी संज्ञा मागील लाकडास असली तरी, तिचे जागीं घसण हा असलेला योग्यतर पर्याय वापरावा, व स्वतः ढकली शब्द जेथें व्युत्पत्तिदृष्ट्या समीचीन दिसतो तेथेंच म्हणजे, पुढील लाकडाचे अर्थी योजावा. असें केल्यानें प्रचारांत असलेल्या या दोन्ही शब्दांचा व्यवहार यथायोग्य होईल.

**गो. कृ. मोडक**

२५१

# शब्दसंग्रह

महादेव विनायक डोंगरे, महाड

साहित्य पत्रिकेच्या पहिल्या वर्षाच्या पहिल्या व दुसऱ्या अंकांत बलगाडीसंबंधीं जे शब्द दिले आहेत त्यांत पुढील भर घातली पाहिजे. पुढील शब्द ठाणें जिल्ह्यांतील माहीम तालुक्यांत विशेष प्रचारांत आहेत.

## रहाट

हात रहाट = हातानें पाणी ओढण्याचा
पाय रहाट = पायानें पाणी लाटण्याचा
बैल रहाट = बैल अथवा रेडा जुंपून पाणी काढण्याचा बैल. रहाटाचे शब्दः–
वांडी = पोहऱ्या, मडकें
फिरकी = माळेला वांडी बांधण्यासाठीं लांकडाची काठी असते ती
माळ = पोहऱ्यांची माळ रहाटाभोंवतीं फिरते ती
रहाट = माळ त्यावर फिरते
पावकें = रहाटाचा हात
लाट = चाकाला जसे आरे त्याप्रमाणें रहाटाला असणारीं आडवीं लांकडें त्यांस 'लाट' म्हणतात
उभक = रेडा किंवा बैल ज्याभोंवतीं फिरतो तें उभें लाकूड
ओढा = रेडा बांधण्याकरितां उभकाला अडकवलेलें आडवें लाकूड
चाकें दोन असतात, उभें व आडवें, एकांत एक अडकवलेलीं
जूंसर = जोखड
लाट = रहाट व चाक यांना जोडणारें आडवें लाकूड
कुंडी = पोहऱ्यांतील पाणी सांडण्यासाठीं बांधलेली लाकडी कुंडी
भोरांडी =
पन्हळ = कुंडींतून पाणी बाहेर जाण्यासाठीं केलेला पत्र्याचा पन्हळ

कुलाबा जिल्ह्यांत महाड तालुक्यांत बैलांची शेपटी चाकाला किंवा गाडीला घासूं नये म्हणून पुढल्या गाताला लागून, एक आडवा वांबू बांधतात त्यास 'ढकली' म्हणतात.

जूंसर = जोखड
वढया = शिपाई, घोडा
मांगल बढ्या = धट
जोता = पट
चकण = धुरांड्यांच्या मधून जोखडाच्या खालीं घातलेली लाकडी पट्टी
नाडी = धुरांड्या व जोखड बांधण्याचा दोर
करवेली = साटीचें पुढील बाजूचें आडवें लाकूड
साटवाव = साटीचीं दोन्ही बाजूचीं लाकडें
रीफ = कठडा
आंस = लाकडीसुद्धां असतो (पहिल्या अंकांत फक्त लोखंडीचाच उल्लेख केला आहे)
डांवर = आंसाच्यावरची व साटीखालची उभी फळी
पडडांवर = लाकडी आंस असल्यास त्यास वरच्याप्रमाणें खालींहि एक फळी असते ती
मोळय = सरी, तुंब्याची धाव
बोऱ्यें = गाताच्या खालची आडवी लाकडी फळी
साटी = गाडीची बैठक
खोडवें = डांबराच्या मागें आलेला धुरांडीचा भाग
आर = पराणी

---

# शेतकीसंबंधी शब्द

[ संग्राहकः-राजाराम प्रल्हाद कानिटकर एम्. ए., धोम (महाबळेश्वर.) ]

[ शेतकीसंबंधींच्या शब्दांचें संकलित स्वरूपांत क्वचितच प्रथन झालेलें आहे. मराठी शाळें-तील क्रमिक पुस्तकांत विद्यार्थ्यांना शेतीसंबंधीं सामान्य ज्ञान व्हावें म्हणून कांहीं धडे घातले आहेत. ते प्राथमिक स्वरूपाचे असले तरी तसा प्रयत्न पुढें कोठेंहि झाला नसल्यामुळें ते उपेक्षणीय नाहींत. शेतकीसंबंधींचे शब्द निरनिराळ्या प्रांतांत अगदीं भिन्नभिन्न प्रकारचे सांपडतात. ह्या प्रांतविशिष्ट शब्दांचा स्वतंत्र संग्रह होणें जरूर आहे.

आधुनिक वाङ्मयांत 'भलरी' 'न्याहारी' किंवा तत्सदृश एखाद दुसरा शब्द मिळवून त्या तुट-पुंज्या सामग्रीवर 'जानपद गीतें' रचण्यांत येत आहेत. पण शेतकीची कांहीं माहिती नसतांना नुसत्या चार दोन शब्दांवर खऱ्या कृषिगीतांची उभारणी कशी होणार? त्यासाठीं शेतांत खपूनच अभ्यास केला पाहिजे. शेतकऱ्यांचीं गाणींहि जमविणें आवश्यक आहे.

पुढें दिलेले शब्द धोम आणि वाईच्या आसपास प्रचलित आहेत. हे शब्द सर्वसाधारण शेत-कीसंबंधींचे आहेत. त्यांत कुठल्याहि विवक्षित पिकासंबंधींचे शब्द मुद्दाम दिले नाहींत. कारण तशा विशिष्ट शब्दांची संख्या अमर्याद होईल. ह्या शब्दांपैकीं सर्वपरिचित शब्दांचे अर्थ दिले नाहींत. महाराष्ट्रीय शब्दकोश मंडळास ह्या शब्दांचा अंशतः तरी उपयोग झाल्यास ह्या संकलनाचें सार्थक होईल. ]

## हत्यारें

औत = नांगर (सहा-आठ-बारा बैलांचा)

नांगरी = लहान नांगर (दोन किंवा चार बैलांचा)

फाळ —

दांडी = नांगर फिरवण्याचें लाकूड

नांगरखुंट = ज्यांत फाळ बसविला जातो तो लाकडाचा ठोकळा

हळस, हळिस, इसाड } बैलाच्या मानेवरील जूं आणि नांगर-खुंट यांच्यामध्यें जी दांडी असते ती

रुमणें—लुमणें = नांगराचा दांडा

शिवाळ = बैलांच्या मानेवर घालण्याचें चौकोनी जूं

पात = शिवाळ्याची खालची दांडी

वसु = फाळ लांकडांतून निसटूं नये म्हणून बस-विलेलें लोखंडी कडें

आंकढी = नांगराचा मुख्य भाग—मोठा दांडा

फोंडी = नांगराची लहान दांडी

कुळव = जमीन भुसभुशीत करण्याचें हत्यार

पास = कुळवाची लोखंडी पट्टी

मैंद = शेत साफ करण्याचें हत्यार

जानवळी = कुळवाच्या पास बसविण्याच्या खुंट्या

गुठ्या = विन पासेचा व विन जानवळ्यांचा कुळव

पाबर = धान्य पेरण्याचें हत्यार

नळे = धान्य पेरण्यासाठीं पाबारीस लावलेल्या कळकाच्या नळ्या.

फण = दाणा खाल जाण्याकरितां जमीन उकरणारें पाबारीस लावलेलें लोखंडाचें फळ

चाडें = ज्यांतून धान्याची मूठ सोडावयाची असतें तें पाबारीचें लांकडी तोंड

फारोळें = पाबारीच्या फणाला लावलेला लहान लोखंडी फाळ.

दिंड = ज्यांत फण वगैरे बसवितात तें पाबारीचें मुख्य लाकूड.

वेर = पाबारीचें जमीनीजवळ असलेलें धान्य पड-ण्याचें भोंक

मोगणा = एकाच वेळीं दोन धान्यें पेरण्यासाठीं पाबारीला जोडलेला स्वतंत्र नळा

दाल्याळ = खत ओढण्याचें पावडें
पाभ्याळें = भात—जमिनींत चिखल करण्याचा बिनपासेचा कुळव
घावडी = तीन पायांची उंच घडवंची
उपणी = उथळ बुरडी पाटी
कोंळपें = वीतभर उंच रोप आलें असतांना त्याच्या भोंवतालची जमीन मऊ करण्याचें व वेणण्याचें हत्यार
तिवडा = खळ्याच्या मध्यभागीं पुरलेला खांब, ज्याच्याभोंवतीं बैल फिरतात तो
खीळ = जुंपणी
तापटणें = शेतावरील चाबूक
आसुटीं = तापटण्याची लाकडी दांडी
आसूड = वादीसह दोरी
खुरपें —
कोयता —
विळा —
बुजगावणें—
माळा —
मोट —
गोफण —
म्होरकें = पीक खाऊं नये म्हणून बैलांच्या तोंडास लाविलेली जाळी

## सामान्य शब्द

वावर = शेत
बांध —
ताल = पाणी अडविण्यासाठीं व शेताचें संरक्षण करण्यासाठीं बांधलेला बांध
सरबांध = मुख्य बांध
चिरा = बांधावरचा हद्दीचा दगड
ऐरण = बांधावरचा हद्दीचा मातीचा ढीग
तुंबा = लहान ताल
बुडकी = लहान विहीर
खाचर = भाताचें शेत
चोंढा = लहान खाचर
घिवार = गांवाच्या मालकीचें जमिनीचें क्षेत्र
तरी = भातजमीन
जिराइत = कोरडवाहू

बागाईत = पाणथळ
खरीप = पहिले पेरे, मृगाचें पीक
रब्बी = दुसरे पेरे, कार्तिक-पीक
जिरतव = पीक
उडवी, उडवा, बुचाड = मळण्यापूर्वी मुरण्याकरितां रचलेला धान्याचा ढीग-रास
गंज = कडब्याचा ढीग
कडपें = धान्य कापून काढल्यावर वाळविण्यासाठीं शेतांत घातलेले लहान लहान ढीग
लागवड, लागण = पेरणी
आगोटी = पावसाळ्यापूर्वीचा महिना
तरवा = भाताचें शेत भाजण्याची क्रिया
राब = जमीन भाजण्यासाठीं पाचोळा, शेण्या वगैरेंचा केलेला थर
खळें = धान्य मळण्याची सारवलेली जागा
मार्डे = पहिलें पीक न काढतां-जमीन मोकळी ठेवून जें दुसरें पीक काढतात तें
बिवड (बीमोड) = दुसरें धान्य पेरण्यापूर्वी निघालेल्या पहिल्या पिकास बिवड म्हणतात
फूल येणें = उन्हानें तापून जमीन सकस होणें
गरारणें = पावसानें पुष्कळ पाणी जमिनींत तुंबणें
झांक = पाखरांचा शेतावर जमलेला जमाव
मलंरी = शेतांत काम करतांना उल्हास येण्यासाठीं गाण्याचें गीत
हळवा = थोड्या मुदतींत तयार होणारें पीक
चोथा = भाताचें रोप
तवरी = भाताचें कणीस
पोठरा = कणी बाहेर पडण्यापूर्वीची कणसाची स्थिति
पेंढा —
भात्याण—
वेंग, वेंध = कवळी
पिशा = मळणी झाल्यावर बिनदाण्याचें जें कणीस उरतें तें
गुती, गूत = भात्याणापैकीं बारीक तुटलेला भाग

गोंड = जोंधळ्याच्या कणसाला असणारा भूस
हुरडा —
मुसकट = भूस
ओंब्या }
लोंब्या } गव्हाचें कणीस
कडवा —
पात = कापणीच्या किंवा बेणणीच्या वेळीं एका माणसानें धरलेली ओळ
मुरडण = एक पात पुरी करून पुन्हा परत फिरणें
पात धरणें = खळ्याभोंवतीं बैल फिरवणें
पाळी देणें = कुळव चालवून जमीन भुसभुशीत करणें
राप लागणें = एकसारखा पाऊस लागणें
काना = पासेनें पडलेली रेघ
तास = नांगरानें पडलेली रेघ
काकी = पाबारीच्या फणानें पडलेली रेघ
नांगरट = नांगरलेली जमीन
पळंज = विनपोसलेलें पोंचट भात
वाढविणें = धान्य आणि कचरा वाऱ्याच्या सहाय्यानें निराळा करण्याची रीत
सांजेला उतरणें = धान्य नेहेमींपेक्षां जास्त पिकणें
अर्धेल = उत्पन्नाचा अर्धा वांटा
खंड = ठराविक मोबदला मालकास देऊन शेत करणें
वाटेकरी = अर्धेलीनें शेत करणारा शेतकरी
सुगी = हंगाम
खंडकरी = खंडानें शेत करणारा शेतकरी
उंडकी लागणें = पाबरीचें बेर माती लागून बंद होणें व त्यामुळें खालीं धान्य न पडणें
परतणें = धान्य पिकण्याच्या पंथास लागणें
मदन = बिन वाढविलेलें व बिन मळलेलें धान्य
पाचुंदा = पांच पेंढ्यांचा गट
पंचादेवीचा वांटा } उत्पन्नाच्या भागापैकीं ३ मालकाचे व २ वाटेकऱ्याचे भाग अशी पद्धत
करळ लागणें = पाबरीच्या फणानें जमीन जास्त खोल उकरली जाणें
शेव लागणें = जमीन उकरली न जाणें, फण वरच्यावर फिरणें
लावणी = भात लावणें
मळणी —
झोडणी —
पेरणी —
कापणी —
बेणणी —
खुरपणी —
निंदणें }
भांगलणें } = बेणणें
चूड कापणें —
माचुंडा —

## शंखाचें गाणें

पत्रिकेच्या गेल्या अंकांतील शंखाच्या गाण्यांत कांहीं चुका असून कांहीं चरण-हि गळले आहेत. करितां पुढीलप्रमाणें दुरुस्त्या कराव्या.

ओळ २ मध्यें "हेरसा" या पदाच्या जागीं "हिरासा"=(हिरा+असा)

ओळ ४ मध्यें "अवचित" या पदाच्या जागीं "अच्युत"

ओळ ४ चे पुढें ॥ गांधारि स्मरल्या पुत्रवंति होये ॥ (हा अधिक चरण)

ओळ १३ गंगावर्ण सवर्ण असा पूज्य (असा चरण)

ओळ १९ चे पुढें खालील चरण अधिकः-॥ शंखेश्वरी शंखनादिनीं ॥ वांगिणी बंकनादीं ॥ जेहेळीं गोपिनाथीं ॥ वेलरीं वेलभद्रीं ॥ ओंकार महाबळेश्वरीं ॥ अलका रामतीर्थी ॥ नरशिया सरस्वती ॥ डंकिनी भिमाशंकरीं ॥ श्रीशैल्य मलकार्जुनीं ॥ औंढ्या नागनाथीं ॥ परळी वैजनाथीं ॥ सोरटी सोमनाथीं ॥ मथुरा कुरुक्षेत्रीं हिमाचळ केदारीं ॥ काशी विश्वेश्वरीं ॥ अंकला मोरेश्वरीं ॥ दारेश्वरी भुलेश्वरीं । पांडेश्वरी कऱ्हाडकोल्हापुरीं ॥ मोरमाथापुरी तुळजापुरीं ॥ गंगा सागरीं ॥ पैठणी भोगावतीचे काठीं ॥ लोणटी मुदूगरीं॥तुंभ-गद्रा हरेश्वरीं ॥ कांमाक्षी पक्षितीर्थी ॥ शिवगंगे शिवकांची ॥ विष्णुकांची अरुणाचळे ॥ अच्युता मोरेश्वरीं ॥ गजेंद्र मोक्षिणी पापनाशिनी ॥

ओळ २८ चे पुढें खालील चरण अधीकः-साठ सहस्त्र कपिला गाईंत्रीं गोदानें ॥ ब्राह्मणास दिल्याचें पुण्य घडे ॥ माध्याह्नीं शंख जपला तर काय घडे ॥ आपले भारंभार सुवर्ण ॥ ब्राह्मणास दान दिल्याचें पुण्य घडे ॥ सायंकाळीं शंख जपला तर काय घडे ॥ ब्राह्मणास पृथ्विदान दिल्याचें पुण्य घडे ॥ त्रिकाळ शंख जपला तर काय घडे ॥ [1]अरात्रिचें सुख ॥ [2]परात्रिचीं साधनें;॥ दुःख दारिद्र्य हरे ॥ चिंता निवारे ॥ दूरचें भेटे ॥ बांदिचें सुटे ॥

रामचंद्र वासुदेव सोमण

### उतती

आपल्या साहित्य पत्रिकेच्या २ ऱ्या वर्षाच्या १ ल्या अंकांत लेखक प्र. धों. कानिटकर यांनी शंका ह्या सदराखालीं उतती उतत्या हें फळ कोणतें असा प्रश्न केला आहे. उतती हा शब्द कानडी असून त्याचा अर्थ 'खारीक' असा आहे. उतत्या हें उततीचें मराठींत अनेकवचन केलेलें आहे. उतती ह्या शब्दाचा खारीक अर्थ शंकास्थानीं दिलेल्या श्लोकांत जुळतो. जुन्याकाळीं मराठी वाङ्मयांत कानडी बरेच शब्द उपयोजिले जात व जुनें मराठी वाङ्मय पूर्णपणें कळण्यास कानडी भाषेचें ज्ञान होणें अगदीं जरूर आहे हें ह्या उदाहरणावरून दिसून येईल.

भालचंद्र रामचंद्र पटवर्धन
कर्नाटक महाराष्ट्र मंडळ, धारवाड

---

१ यालोकचें    २ परलोकाचीं

# मराठींतील शुद्धिभ्रम इत्यादि

(लेखकः–गोविंद कृष्ण मोडक)

**१ मथळ्याचा अर्थ**–कांहीं शब्द योग्य कारण नसतांनाहि लोकांकडून वेडे-वाकडे उच्चारिले जातात; उदाहरणार्थ–सान्त्वन-चे जागीं शांतवन, कर्जतचे जागीं कर्जंत. अशा शब्दांचीं मूळरूपें उच्चारावीं, असा साहजिकच विद्वानांचा आग्रह पडतो; व तदनुसारें ते मूळरूपें प्रवृत्त करूं पाहतात. या प्रयत्नास भाषेच्या शुद्धीचा प्रयत्न असें म्हणतात. हा प्रयत्न कधीं कधीं चुकीचे समजुतीवर आधारिलेला असतो; अशा प्रयत्नानें सुचविली किंवा केली जाणारी शुद्धि म्हणजे केवळ शुद्धिभ्रम होय. असा प्रकार प्रायः सर्वच भाषांत थोडथोडा आढळतो. याचीं कांहीं उदाहरणें खालीं देण्याचें योजिलें आहे.

**२ रूपांतराचीं कारणें**–बदल हा सृष्टीचा एक दांडगा नियमच असल्यानें, शब्दांचे उच्चार, व तदनुसारें त्यांचीं रूपेंहि, नेहमीं थोडींफार हळूहळू बदलत असतात. याच प्रवृत्तीमुळें मराठींत हल्लीं अनुनासिकवाद माजून राहिला आहे. एके काळीं जे अनुनासिक स्पष्टोच्चारित होते ते आज निभृत होत चालले आहेत, व कालांतरानें पार अस्तंगतहि होतील. विंशति-मधील अनुस्वाराचें रूपांतर प्रथम अनुनासिकांत झालें असलें पाहिजे. आज आपण त्याचें रूपांतर असलेला वीस हा शब्द सर्वथा निरनुनासिक असाच उच्चारितों व लिहितों. उच्चारांतील फरक वारंवार ऐकण्यांत येऊन, तो शिष्टसंमत झाला म्हणजे त्यास लेखनांत मान्यता मिळते; मग कोणी आग्रहानें उच्चारांतील तो फरक मान्य करोत वा न करोत. लोकमान्यांचे काळीं व त्यांचे लेखणींतून नेहमीं (तीं) जात्ये, बोलत्ये अशीं यकारविशिष्ट रूपें ऐकूं येत असत; तर आज तींच यकारहीन उच्चारिलीं व लिहिलीं जातात. जी यकाराची गति येथें झाली, तीच अनुनासिकांची क्रमानें होणार. सावळा हा शब्द कोणी उलट आग्रह धरिला तरी निरनुनासिकच उच्चारला व लिहिला जाणार.

**३ उदाहरणें**–या प्रवृत्तीस अनुसरून शब्दांचीं रूपांतरें नेहमींच होत राहणार. यास कोणी हरकत घेत नाहीं. पण अशीं रूपांतरें जेव्हां गैरसमजानें प्रवृत्त होतात, तेव्हां त्यांस विरोध करणें प्राप्त आहे. अशीं कांहीं उदाहरणें पुढील होत–

(१) शब्दात्मक–अंधकार, चरित, दुष्ट, धिक्कार, निद्रित, पुंलिंग, ब्राह्मण, मशहूर, लाजहोम, रेफ, लागलेंच, वैयाकरण, शतक्रतु, संपुट, सीमान्तपूजन इ०. या शब्दांचे ठिकाणीं क्रमशः अंधःकार, चरित्र, द्रुष्ट, धिःकार, निद्रिस्त, पुंल्लिंग, ब्राम्हण, महशूर,

लज्जाहोम, रफार, लागलीच, वैय्याकरण, शतकृत्य, संपुष्ट, श्रीमंतपूजन इ० असे शब्द येतात. हीं सर्वच उदाहरणें आक्षेप्य नाहींत. यांचीं क्रमानें परीक्षा करूं. (क) अधःपात वगैरे कांहीं संस्कृत समास सविसर्ग असून, मराठींत आले आहेत. त्यांच्याशीं नसताच संबंध कल्पिण्यांत येऊन, अंधकार, धिक्कार, हाहाकार या शब्दांत विसर्ग मानण्यांत आला आहे. अर्थात् या शब्दांतील विसर्ग केवळ अज्ञानमूलक असल्यानें तो लोपार्ह आहे. (ख) मराठींतल्यापेक्षां संस्कृतांत जोडाक्षरें पुष्कळ अधिक असल्यानें दोन सदृश रूपांतील जोडाक्षरानें युक्तरूपच संस्कृत असलें पाहिजे असें मानण्यांत येऊन, चरित्र, द्रुष्ट, निद्रित हीं अपरूपें प्रचारांत आलीं आहेत. येथेंहि रूपांतरास अज्ञानाव्यतिरिक्त कारण नसल्यानें, येथील रूपांतरें सर्वस्वीं त्याज्यच होत. संस्कृतांत चरित म्हणजे जन्मापासून मरणापर्यंतचा इतिहास, एखाद्या व्यक्तीचा सर्व वृत्तान्त; आणि चरित्र म्हणजे चरिताची सरणी. त्र हा प्रत्यय धातूस करणार्थे लागतो. ज्यानें चरित ठरविलें जातें तें चरित्र. चरित हा शब्द कर्मबोधक, तर चरित्र हा शब्द करणबोधक आहे. मराठींत कर्मबोधकाचे जागीं, जोडाक्षरयुक्त शब्द संस्कृत असला पाहिजे अशा भ्रमानें, चरित्र हा करणबोधक शब्द आला आहे. अर्थात् तो भ्रममूलक, सबब त्याज्य आहे. पुंलिंग असा एकलकारात्मक संस्कृत शब्द असून वरील भ्रमानें मराठींत तो पुंल्लिंग असा योजण्यांत येतो. संपुटचें संपुष्ट हें रूपांतरहि वर्जनीयच होय. वैयाकरण यांत विनाकारण दोन यकार लिहितात. सारांश येथील शब्द चरित, दुष्ट, निद्रित, पुंलिंग, वैयाकरण, संपुट असेच लिहिले पाहिजेत.

४ **समर्थनीय रूपांतरें**–संस्कृतांत कह्लार हा शब्द सोडून (ज्याचेंहि कल्हार असें वैकल्पिक रूप आहेच) जोडाक्षरांत इतर व्यंजनाच्या (र-सोडून, ज्याचेहि बाबतींत दोन्ही प्रकार आहेत) पूर्वी हकार येतो, नंतर येत नाहीं. अर्थात् ब्राह्मण अशा शब्दांत ह पूर्वीं उच्चारला जातो. पण हा उच्चार मराठी बोलणारांस फार कष्टप्रद वाटतो, व ते त्यांतील व्यंजनांची उलटापालट करितात. करितां **उच्चारसौकर्य** हे योग्य कारण मुळाशीं असल्यानें **ब्राम्हण** असें रूप लिहिणें योग्यच ठरतें. कोणी संस्कृताभिमानी ब्राह्मण असेंच लिहील व उच्चारील, तर त्यास मुभा आहेच; कारण हा प्रकार मूलानुसारीच आहे. सीमान्तपूजन हा शब्द विवाहांतील एका समारंभाचा वाचक आहे. नवरदेव नवरी करण्याकरितां तिचे गांवीं येतो, तेव्हां त्या गांवाचे सीमेचे प्रदेशीं (=सीमान्तीं) त्याचें पूजन करितात; त्यास सीमान्तपूजन म्हणतात. पूजन वराचें, तेव्हां तें श्रीमंती थाटाचेंच असणार. या आगन्तुक पण **प्रशस्त कल्पनेनें** श्रीमंतपूजन हें रूप प्रचारांत आलें. हें, आगंतुक कां होईना, पण इष्ट अशा कल्पनेचें द्योतक असल्यानें, सर्वथा त्याज्य ठरत नाहीं. अशी स्थिति लाजहोमाचे जागीं प्रयुक्त होणाऱ्या लज्जाहोम या शब्दाची नाहीं. लाजहोम केल्यानें लज्जेचा होम होतो ही गृहीत कल्पनाच भ्रांत, आचरट आहे. करितां लज्जाहोम हा शब्द आक्षेपार्हच ठरतो. भूलोकाहून स्वर्ग श्रेष्ठ, तेथेंहि सर्वांत इन्द्र श्रेष्ठ. इंद्राचें पद सर्व जगांत अत्यंत वैभव-

संपन्न मानिलें जातें. तदर्थ करावयाचें कृत्यहि मोठें, कष्टसाध्यच असणार. हें कृत्य म्हणजे शतक्रतु अथवा शंभर यज्ञ. हें शंभर यज्ञ पूर्ण करण्याचें कृत्य सामान्य नसल्यानें **शंभर कृत्यांत मुख्य** गणलें जाण्यासारखें आहे. या कल्पनेनें शतक्रतूचें रूपांतर शतकृत्य असें झालें. येथील रूपांतराचे मुळाशीं असलेली कल्पना, शब्दांचा अर्थ त्याचे अवयवार्थांवरून काढण्याचे प्रयत्नानें प्रवृत्त झाली असल्यानें, कांहींशी आदरणीयच वाटते. दिसते त्याचे पलीकडे जाण्याची माणसाची प्रवृत्तीच असते. इंद्रास इन्द्रपद मिळालें आहे तें कशानें ? शतकृत्यामुळें. मोठें वैभव मोठ्या अचाट कृत्यानें मिळणें, सुसंगत भासतें. तेव्हां इन्द्रपदाचे साधनीभूत कृत्यास शतकृत्य म्हणणें ओघानेंच प्राप्त झालें. सारांश- अवयवार्थापासून शब्दार्थ काढण्याची प्रवृत्ति डोळस आहे, तेव्हां ती भ्रमाश्रित झाली तरी तितकीशी गर्हणीय नाहीं. यवनी शब्द **मशहूर** 'प्रसिद्ध' अशा अर्थाचा बोधक आहे. पण हा अर्थ या शब्दास कसा आला असावा ? असा प्रश्न मनांत उभा राहून, त्याचें समाधान अक्षरांच्या उलटापालटीनें सहज होण्यासारखें आहे हें पाहून, कोणी त्याचें रूपांतर महशूर असें केलें. यांतील मह-चें वर्णदृष्ट्या महा-शीं नातें, व शूर याचा 'छातीचा' हा उन्नत, स्पृहणीय अर्थ. या दोनहि गोष्टी ' प्रसिद्ध ' या विवक्षित अर्थाशीं संवादी असल्यानें, **महशूर** हें शब्द-रूप राजमान्य झालें आहे. येथेंहि **अवयवार्थनिष्कर्ष व कल्पनासंवाद** या द्विविध कारणास्तव महशूर हें रूपांतर संग्राह्यच ठरतें.

५ **हताः पाणिनिना वयम्**—( १ ) ' किल्ली दिली कीं घड्याळ लागलेंच चालू होईल, ' असल्या वाक्यांत लागलेंच हें क्रियापदाचें विशेषण असल्यानें, यावच्छक्य त्याशीं समधर्म असणार; क्रियाविशेषण लिंगवचनांत क्रियापदाशीं मिलाफ पावतें. परंतु ही रीत 'लागलेंच' याचे बाबतींत कधीं कधीं पाळण्यांत आलेली दिसत नाहीं. याचें कारण तर्खडकरकृत भाषांतरपाठमालेंतील **लागलीच** या शब्दाचा प्रयोग. **सामान्य ठिकाणीं नपुंसकलिंगाची प्राप्ति** उचित असल्यानें Immediately चा मराठी पर्याय म्हणून **लागलेंच** हें रूप प्राप्त होतें. पण कर्त्याचे तोंडी बसलेल्या भाषेनुसार, तत्स्थानीं लागलीच हें रूप आलें; व तें बरेंचसें विद्यार्थ्यांमध्यें, अर्थात् सुशिक्षित १।२ पिढ्यांत, रूढ झालें आहे. यामुळें 'लागलेंच' चे ठिकाणीं प्रामादिक लागलीच हें रूप प्रवृत्त झालें आहे. अर्थात् हे लेखकाचे संसर्गदोषामुळें उत्पन्न झाले असल्यानें, सर्वथा त्याज्य आहे. अशा रीतीनें ग्रंथकाराकडून चांगलें वळण लावण्याचे ऐवजीं वाईटच वळण लोकांपुढें ठेविलें गेलें आहे. ग्रंथकार उपकारकाचें ऐवजीं अपकारक ( अर्थात् एवढ्या बाबीपुरता ) ठरला आहे. भगवान् पाणिनीलाहि मनस् शब्दाचे लिंगाचे-संबंधांत विनोदानें कांहींसा अशाच प्रकारचा दोष देण्यांत आला आहे. वर्णाचा उल्लेख **कार** हा प्रत्यय पुढें लावून करण्याचा संस्कृत व्याकरणाचा नियम आहे. यास अनुसरून च् हें व्यंजन च–कार म्हणून बोधित होतें. तसें र् हें व्यंजन रकार म्हणून बोधित व्हावें; पण संस्कृतांत त्याचा उल्लेख रेफ या शब्दानें करण्यास

व्याकरण सांगतें. तदनुरूप मराठींत तें **रेफ** या संज्ञेनें किंवा सामान्य नियमानुसार **रकार** या संज्ञेनें उल्लिखित व्हावें; पण कांहीं ग्रंथकार त्याचा उल्लेख रफार या संज्ञेनें करितात. हाहि 'हताः पाणिनिना वयम्' याचाच एक नमुना, पण सर्वथा अनिष्ट नमुना आहे. भाषांतरपाठमालेंत upon या अव्ययाचे उपयोग सांगतांना, टेकू शब्दाचा प्रयोग केला आहे; पण भाग्य मराठीचें कीं, हा ग्राम्य शब्द शिष्ट भाषेंत रूढ झाला नाहीं. सारांश–ग्रंथकार व लेखक यांनीं शब्द योजणें ते फार जपून योजावे; नाहींतर वरीलप्रमाणें भाषादूषणाचे ते दोषी व्हावयाचे.

६ **प्रामादिक वाक्प्रचार**—[ १ ] एखाद्या कामाकरितां कांहीं जमाव करावयाचा असला म्हणजे कांहीं लोक आपण नेमितों. या लोकांचा तो जमाव बनतो. येथें जमाव व लोक यामध्यें व्यापक–व्याप्य, समावेशक–समावेश्य, अंगिन्–अंग अशा प्रकारचा संबंध असतो. या कळपांत २० गाई आहेत, या वर्गांत ३० मुलें आहेत, या **मंडळांत** १० मनुष्यें आहेत, असले शब्दप्रयोग आपण करितों. सारांश 'घटक जमावांत घातले' अशी भाषा आपण योजितों. पण बरेच लोक, शिष्टसुद्धां, 'या कमिटीवर, कमिशनवर अमूक गृहस्थ नेमले आहेत' अशी शब्दयोजना करितात, ही आक्षेप्य दिसते. **घटक आंत असतो**, ही गोष्ट मनांत वागवून, येथें प्रयोग आंत-चा व्हावा, वर-चा करणें गैर आहे. येथें वर योजिल्यानें आणखी एक प्रमाद होतो; तो हा कीं, हा प्रयोग घोटाळा उत्पन्न करणारा होणार. कारण **कमिटीवर नेमिला** या शब्द-प्रयोगाचा मराठी वाचक असाच अर्थ करील कीं कमिटीवर मुख्य-अधिकारी-म्हणून नेमिला; पण हा अर्थ तर विवक्षित नाहीं. करितां **मराठीभाषासरणीभंग व संदेहसंभव** असे दोन दोष उत्पन्न होतात. म्हणून 'कमिटींत अमक्यास नेमिलें' अशीच रचना त्या कमिटीचे घटकासंबंधानें करावी. ( २ ) व्यायाम घेणें, काळजी घेणें, इत्यादि प्रयोगांत घे हा धातू आक्षेपार्ह आहे. संस्कृतांत व्यायामं कृ, चिन्तां कृ, असे प्रयोग होतात. 'कोण करील माझी चिंता ?' अशा ठिकाणीं जुन्या मराठी वाङ्मयांतहि चिंता ( काळजी ) करणें असाच प्रयोग होतो; व्यायाम, काळजी, परिश्रम, करणें असले प्रयोग शुद्ध मानावे; इतर अशुद्ध समजून टाकावे. 'कारखाना मोठ्या प्रमाणावर काढणें,' येथें मला वाटतें, **प्रमाणांत काढणें** हेंच मराठींत उचित होईल.

७ **पेक्षां-पुढें अधिक-चा उपयोग**—पाण्यापेक्षां पातळ, विषापेक्षां कडू, सोन्याहून पिवळें, दगडापेक्षां वीट मऊ, असे असंख्य प्रयोग मराठी वाङ्मयांत पदो-पदीं आढळतात, व आपण बोलतांनाहि करितों. पण येथें हून व पेक्षां-पुढें इंग्रजी रिवाजाला अनुसरून वारंवार अधिक पदाचा उपयोग करण्यांत येतो. तो माझे मतें दूषणीय आहे; करितां सोनें रुप्यापेक्षां जड असतें; असाच प्रयोग करावा; त्यांत 'अधिक' किंवा 'जास्त' हें पद घालण्याचें कारण नाहीं.

८ **नादसाम्य हें प्रमादास कारण**—ही गोष्ट त्याला **हस्तामलक** आहे, अशा वाक्यांत, मला वाटतें, हस्तामलक याचा उच्चार **हातचा मळ** असा अज्ञ जनांकडून केवळ ध्वनिसाम्यानें मानण्यांत येऊन, हातचा मळ म्हणजे 'अत्यंत सोपी गोष्ट' असा अर्थ प्रचारांत आला आहे. हें रूपांतर केवळ प्रामादिकच असल्यानें, त्याचे जागीं मूळ रूप वापरणें योग्य दिसतें. करितां हातचा मळ याचे ठिकाणीं हस्तामलक हाच प्रयोग करावा. गाडगें धुवून कढी करणें, ही कार्पण्यसूचक म्हण हल्लींच्या भलत्याच रूपविपर्यासांतून काढून प्रचारांत आणण्यालायक आहे. येथील विपर्यासासहि नादसाम्य हेंच कारण झालेलें दिसतें.

९ **व्याकरणांतील कांही संज्ञा**—संस्कृतांत विभक्तिप्रत्ययांचा प्रत्याहार सुप् असा आहे; ज्यावरून विभक्तिपदास सुबन्त ही संज्ञा क्रमप्राप्तच आहे. मराठींत असा सुप् प्रत्याहार नाहीं. करितां मराठींत विभक्तिपदास सुबन्त म्हणणें मूर्ख-पणाचें आहे. इंग्रजींतील going असल्या ing प्रत्ययान्त शब्दाला ऊन प्रत्ययान्त धातुसाधित अव्यय म्हणणें जितपत शोभेल, तितपतच मराठींतील विभक्तिपदास सुबन्त म्हणणें शोभेल. ( २ ) इंग्रजींत कोशगत शब्द व वाक्यगत पद यांत फरक फारच थोडा होत असल्यानें, तेथें त्यांतील भेद मानीतच नाहींत, असें म्हटलें तरी चालेल. मराठींतील स्थिति निराळी आहे. करितां इंग्रजींत to go याला verb म्हणतात म्हणून, जा याला **क्रियापद** म्हणणें योग्य नव्हे; त्यास **धातू**च म्हटलें पाहिजे. सव्ययाचे भेद नाम, सर्वनाम, विशेषण व धातू असेच संज्ञित केले पाहिजेत. (३) संस्कृत भाषेंत आपण आपल्या परोपकारी प्रवृत्तीस अनुसरून विशिष्ट क्रमानें पुरुषसंज्ञा योजितों. हजर नसलेल्या माणसास, तो ती इत्यादिकांस, **प्रथम पुरुष**, तूं तुम्ही यांस **मध्यम पुरुष**, अनुपस्थित किंवा पाहुणा व संबोध्य यांची सोय झाल्यावर, मग आपली पाहणें बरें, या प्रवृत्तीस अनुसरून मी, आम्ही यांस (उत्तम=) **शेवटला पुरुष** अशा संज्ञा आहेत. पण मराठी व्याकरणकारांनीं, विशेषतः दादोबांनीं, यांचा विपर्यास केला व त्या इंग्रजींतील पुरुषांशीं जुळल्या केल्या. हा एक प्रकारचा जाणून बुजून केलेला फरक आहे. याचे मुळाशीं एक प्रकारची **सोय** पाहिली असल्यानें ही नवीन संज्ञापद्धति रक्षणीय दिसते, ती बदलण्याचें कारण दिसत नाहीं.

---

# शंका, चर्चा इ०

## रा. प्र. धों. कानिटकर यांच्या कांहीं शंकांचीं उत्तरें वगैरे.

(लेखकः- गो. कृ. मोडक)

१ कोष्टा कोष्टक, चोर चोर म्हणिजे, ना सर्वथा रक्षणें ॥ रु. स्व. स. १।४६

(क) येथें कोष्टचा अर्थ खजिना (आधेय), द्रव्यादि असा आहे. त्याच्या रक्षणार्थ 'भोंवतालची भिंत' असा अर्थ कोष्टक शब्दाचा आहे. सारांश, त्याचे राज्यांत कशाच्या भोंवतीं भिंत सांपडली तर ती फक्त खजिन्याच्याच. नगरास परचक्राचे भीतीचे अभावीं तिची जरूरच नव्हती. रा. कानिटकरांनीं म्हटल्याप्रमाणें येथें परिसंख्यालंकार साधला असल्यानें इतरत्र भिंत नव्हती हें विधान लाक्षणिक अर्थानेंच घ्यावयाचें; प्राथमिकार्थानें घ्यावयाचें नाहीं.

(ख) 'वित्तं न गोपयति यस्तु वनीयकेभ्यः' कविरहस्य.

या चरणांत, कृष्णराजा याचकांपासून द्रव्य राखून ठेवीत नाहीं, असा अर्थ विवक्षित आहे. असलाच अर्थ **'ना** सर्वथा रक्षणें' या उक्तींत आहे. मागणारापासून तो राजा कांहीं राखून ठेवीत असेल तर तो केवळ 'ना'च होय; 'नकारच होय'. नकार मात्र तो कोणास देत नसे. त्यापासून सर्व याचकांस सर्व मिळत असे, मात्र नकार कोणास मिळत नसे. सारांश तो याचकांना त्यांना जें जें पाहिजे असेल तें तें देत असे.

५ रतिवरशत्रुभूषण कुमारी । सखिया देती न अंगिकारी ॥
लोकप्राणेशवनजात सुंदरी । त्यागी दूरी विरहज्वरें ॥

श्रीधर पांडवप्रताप २५।४३

रतिवरशत्रुभूषण म्हणजे रतीचा पती मदन त्याचा मारक जो शिव त्याचें भूषण सर्प अथवा **नाग**. नाग म्हणजे पानवेल असाहि अर्थ आहे. येथें प्रस्तुत समासाचा अर्थ नागवेल किंवा उपलक्षणानें **'विडा'** असा घ्यावा.

लोकप्राणेशवनजात— लोकांचा प्राण म्हणजे वायु अथवा मरुत्. मरुत म्हणजे देव असाहि अर्थ आहे. तेव्हां लोकप्राणेश म्हणजे देवांचा राजा इंद्र असा अर्थ ठरतो. त्याचें वन म्हणजे नंदनवन. त्यांत जन्मलेलें म्हणजे (नंदनजात) हरिचंदन. या पदानें लक्षणेनें **चंदन किंवा त्याची उटी** असा अर्थ विवक्षित दिसतो. विरहतप्त लोकांस उपचार म्हणून त्यांचे आप्त चंदनाची उटी लावितात. पण त्यांना ती तापदायकच वाटते. तसेंच, अशा विरहावस्थेंत विडा वगैरे चैनीचे पदार्थहि त्यांना त्याज्यच वाटतात. येथील अर्थ उत्पन्न होण्यास रा. कानिटकर यांनीं दिलेल्या पाठांत

तीन ठिकाणीं फरक केला आहे; तो असा– कुमारी व सुंदरी हीं पदें मागील पदांशीं समस्त न करितां, स्वतंत्र दिलीं आहेत. त्यागिली-चे जागीं त्यागी असा पाठ घेतला आहे. अशा फरकाच्या अभावीं, यथास्थित पाठ घेतल्यास, माझे मतें ओवीचा अर्थ लागत नाहीं. कोणाला लागल्यास अर्थात् मी तो आनंदानें स्वीकारीन.

७ **त्रिक** हा शब्द ज्ञानेश्वरींत नपुंसकलिंगी आढळतो. त्याचा अर्थ सौंदर्य असा बसेल. परंतु तेवढ्यावरून तो अभिल्या या शब्दावरून साधूं पाहाणें मला धाडसच वाटतें. वर्णदृष्ट्या व अर्थदृष्ट्याहि जरी दोन्ही शब्दांत साम्य असलें तरी, अभिल्या स्त्रीलिंगी असून त्रिक न. लिं. आहे; ही अडचण मला विचारणीय वाटते. तेव्हां प्रस्तुत शब्द देशी असावा असें दिसतें.

## व्युत्पत्तिविचार

१५ नाहीं हा शब्द द्विविध आहे. क्रियाविशेषण व क्रियापद. पैकीं क्रियाविशेषण असतांना तो 'नहि' वरून साधतो; पण क्रियापद असतांना तो 'नास्ति' वरून आला असावा. क्रियाविशेषण असतांना त्याचा अंत अनुनासिक बनला. (अशी मराठीला खोडच आहे. क्रियाविशेषणाचे अकारभिन्न दीर्घ अंत सानुनासिक होतात; जसें– कधीं, खालीं इत्यादि.) क्रियापद व क्रियाविशेषण असलेल्या या शब्दद्वयाचे भिन्नभिन्न व्युत्पत्तीकडे दुर्लक्ष्य होऊन क्रियापद असतांनाहि त्याचा अंत क्रियाविशेषणाप्रमाणें सानुनासिक लिहिण्याचा प्रघात पडलेला दिसतो. याच गोष्टीचें समर्थन, आहे (तृ० पु०) चा अंत्यस्वर सानुनासिक नाहीं, यानें होतें. देऊनियां, घेउनी वगैरे धातुसाधित क्रियाविशेषण अव्ययेंहि सानुनासिकांतच लिहितात.

२४ बावन–हा पावन-चा अपभ्रंश असावा. पावन म्हणजे शुद्ध किंवा पवित्र करणारा. याचा अर्थ धूप असाहि आहे. धूप शुद्धिकारक असल्यामुळेंच त्यास पावन म्हणण्यांत येत असावें. चंदन आपल्या वासाचे योगानें हवा शुद्ध करणारा आहे, हें उघड आहे. तेव्हां पावन हा शब्द चंदनाचा वाचक बनला असावा. पावन-मध्यें आद्य वर्ण मृदु होऊन बावन हा शब्द बनला आहे.

२८ मान म्हणजे क्रोध, हें समीकरण योग्य दिसत नाहीं. मान म्हणजे आढ्यता, तन्मूलक अनादर, नापसंती. वेळेस क्रोध असाहि अर्थ होतो. पण त्यांत 'दुसऱ्याचें अनिष्टचिंतन' नसतें. करितां मान म्हणजे क्रोध न म्हणतां 'नम्रतेचा अहंकारमूलक अभाव' म्हणावें. धन्यास चाकराचा क्रोध आला, अशा ठिकाणीं मान शब्द घालतां येणार नाहीं. कोणत्याहि अर्थांत मन् 'पूज्य मानणें' हाच धातु आहे.

३५ सावली हा शब्द शाखावरून साधिला आहे. कां ? तर तो तसा हेमचंद्र सांगतो म्हणून. शाखा– सावली यापेक्षां छाया–सावली हें युग्म जास्त दृढान्वित नाहीं काय ? शाळा=साळ, छागल–सागळ यांत दिसून येत असल्याप्रमाणें– सावलींतील **सा** हा **शा** किंवा **छा** यांतून कोणावरूनहि निघेल. करितां जसा शाखा-

वरून, तसा छायावरूनहि सावली शब्द साधेल. ख्र मधील कला खो द्यावा लागतो, आ–स्थानीं उ ठेवावा लागतो, नंतर त्यांतील ह् लोपून उकार शेष ठेवावा लागतो व नंतर त्यांत उ-चा व केल्यानें सावली हा शब्द सिद्ध होतो. (शाखा-साहा-साहुली-साउली-सावली). मला वाटतें यापेक्षां य चा व होणें जास्त साहजिक आहे. उपाय–चें उपाव हें रूपांतर सर्वश्रुतच आहे. तेव्हां वर्णदृष्ट्या सावली हा शब्द शाखापासून न निघतां, तो माझे मतें छाया–वरून निघाला आहे. येथें कोणी म्हणेल हें म्हणणें हेमचंद्राचे विरुद्ध आहे. कबूल. पण हेमचंद्रहि मनुष्यच असल्यानें तो प्रमादातीत नाहीं. क्वचित् ठिकाणीं तो घसरला म्हणून आपणहि आंधळेपणानें त्याचे मार्गे जाऊं नये. त्याचें म्हणणें तर सर्व ऐकावें, पण तें ग्रहण करितांना आपण सारासार विचार केलाच पाहिजे. विचारस्वातंत्र्य गमावणें चांगलें नाहीं. जर शाखा, छाया व सावली असे तीन शब्द आपल्यापुढें आहेत, तर त्यांतील संबंध ठरवितांना आपली बुद्धी 'बाबावाक्यं प्रमाणं' या न्यायाचे प्रवाहांत वाहूं देऊं नये. करितां, (१) वर्णदृष्ट्या छाया हा शब्द सावलीस जितका जवळ आहे, तितका शाखा नाहीं. (२) अर्थदृष्ट्या छाया हा शब्द तर सावलीशीं अभिन्नच आहे, तसा शाखा मुळींच नाहीं. या दोन कारणांस्तव सावली हा शब्द छाया-वरूनच निघाला आहे असें दिसतें.

२८ मुंडासें– हा शब्द साधतांना मूर्धन् या संस्कृत शब्दाकडे जाणेचें कारण दिसत नाहीं. संस्कृतांतच मुण्ड हा शब्द रूढ आढळतो. मुण्डितमुण्ड, नरमुण्डम्, मुण्डावली वगैरे संस्कृत शब्दांत हा आढळतो. करितां मुण्डवासस् या संस्कृत समासावरूनच प्रस्तुत शब्द साधावा.

———

# पुस्तकपरीक्षण.

## पुरंदरे दप्तर. भा. १ ला.

( लेखकः—प्रो. रा. वि. ओतूरकर, नाशिक. )

प्रस्तुत पुस्तक हें भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या स्वीयग्रंथमालेंतील ३२ वें पुस्तक होय. ह्यांत श्रीमंत रा. मल्हारराव पुरंदरे व श्री. रा. बापूसाहेब पुरंदरे बी. ए. या पुरंदरे सरदारांच्या संग्रहांतील एकंदर ४२६ पत्रें छापिलीं आहेत. व सदरहू पुस्तकास सासवडचे संशोधनकुशल श्री. कृष्णाजी वासुदेव पुरंदरे यांनीं एक ६६ पानांची रसोद्ग्राही प्रस्तावना जोडलेली आहे. या सर्वांचें समीक्षण करण्यापूर्वी एका अवांतर परंतु प्रासंगिक मुद्याचा उल्लेख करावासा वाटतो. प्रस्तुतचें पुरंदरे दप्तर भा. इ. सं. मंडळाच्या स्वीयमालेंत अर्थात् मंडळाच्या खर्चानें प्रसिद्ध होत आहे व उभयता पुरंदरे श्रीमंतांनीं " आपला अमूल्य संग्रह विश्वासपूर्वक व आपलेपणाचे भावनेनें हवालीं केला नसता तर कांहींच करतां आलें नसतें. तेव्हां या बाबतींत खरे उपकार त्यांचेच आहेत. " ( प्रस्तावना पा. ६६). असे कृतज्ञतेचे उद्गार काढून संपादक तेवढ्यापुरतें स्वतःचें समाधान करून घेत आहेत व तादितर पुरंदरे मंडळीस साधनसंग्रह खुला करण्याची विनंति करीत आहेत ही गोष्ट श्रीमंतद्वयांच्या पितृऋणासंवर्धींच्या जागरूकतेस कांहींशी कमीपणा आणणारी आहे. सदरहू साधनें उजेडांत आणण्यास ऋणभारानें नम्र झालेल्या व निरलस परंतु निष्कांचन संशोधकांनीं धरलेल्या मंडळास पदरमोड काय म्हणून करावी लागावी ? असा प्रश्न विचारल्यास त्याचें समाधानकारक उत्तर मिळेलसें वाटत नाहीं. या बाबतींत कै० राजवाडे यांनीं अकराव्या खंडाच्या प्रस्तावनेंत राजेरजवाडे व सरदार यांच्या डोळ्यांत अंजन घालणारे काढलेले उद्गार अद्याप पुरेसे परिणामकारक झाले नाहींत असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. यंदा झालेल्या भा. इ. सं. मंडळाच्या संमेलनप्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें समारोपादाखल श्रीमंत बाळासाहेब औंधकर यांनीं कांहींसे वैतागानें असे उद्गार काढले कीं ' आम्ही हवेतर तुम्हांबरोबर मंडळाच्या भिक्षेची झोळी घेऊन येतों पण आपण आम्हां संस्थानिकांकडे ढुंकून पाहूं नका ' हे शब्दहि याच गोष्टीची साक्ष देतात. नुकतीच ग्वालेर दरबारनें भा. इ. सं. मंडळाकडे शिंदे दरबारचे कागदपत्र पहाण्याच्या कामीं एका गृहस्थाची नेमणूक केली आहे ही गोष्ट अभिमानपूर्वक दाखल करावीशी वाटते. हाच उपक्रम इतर संस्थानिक करतील तर संशोधनाच्या कार्यास मोठेंच बळ चढेल. मात्र हें संशोधन चालू असतां त्या त्या घराण्याला अनुकूल किंवा प्रतिकूल सर्व कागदांची **निर्विकारपणें** छाननी झाली पाहिजे. व प्रसंगीं प्रतिकूल पुरावाहि दप्तरीं दाखल करण्यास कचरतां कामा नये इतका इषारा जातां जातां देऊन ठेवणें इष्ट आहे.

श्री. पुरंदरे मास्तर यांनीं प्रस्तुत पुस्तकास जोडलेल्या प्रस्तावनेंत हीच समतोल वृत्ति धारण केली आहे. ह्या भागांत त्यांनीं इ. स. १६९२ ते इ. स. १७६१ ह्या सत्तर वर्षांच्या घडामोडीचा त्रोटक विचार केला आहे. त्यांत त्यांनीं मराठी राज्यासंबंधीं काढलेल्या स्तुतिनिंदापर उद्गारांत अवास्तवपणा कोठेंहि आढळून येत नाहीं. पुरावा पुढें दिसेल त्याप्रमाणें ते त्या त्या प्रसंगास लेखक आपलें शेलापागोटें बहाल करीत आहेत. इतिहास-संशोधनाच्या कार्यास आवश्यक असा शास्त्रीय समतोलपणा येत असल्याचें हें निदर्शक होय. मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं परकीयांनीं काढलेल्या निरर्गल प्रलापामुळें कै. कीर्तने, साने, रानडे प्रभृतींनीं उत्तरादाखल इतिहास-संशोधनास सुरुवात केली. व गेलीं चाळीस

वर्षे मराठ्यांच्या इतिहासांतील अनेक अभिमानास्पद गोष्टी उजेडांत आल्या. कै. राजवाडे यांच्या लेखणीनें संशोधनप्रांतांत विविध विषयांत संचार केला आहे. परंतु मराठ्यांच्या दोषांचें निर्भीड प्रदर्शन करण्याचें कटुकार्य त्यांनीं होतांहोईतों टाकलेंच आहे. ही निर्भिड दोषाविष्करणाची पद्धत माझ्या मतें श्री. केळकर यांनीं मराठे व इंग्रज या पुस्तकांत प्रथम सुरू केली व कै. खरे यांनींहि त्याच पुस्तकास जोडलेल्या प्रस्तावनेंत तेंच कार्य केलें. तेजोभंग करणारी निंदा व अंधप्रेम उत्पन्न करणारी स्तुति या दुहेरी दोषापासून सारखीच अलिप्त असणारी ही समतोल वृत्ति पुढें वाढत गेलेली आढळते व तिचेंच प्रत्यंतर श्री. पुरंदरे यांची प्रस्तावना होय. मराठ्यांच्या रजपुतांशीं झालेल्या व्यवहारासंबंधीं लिहितांना ते म्हणतात. "या ठिकाणीं आम्हांला ( मराठयांना ) ऋण झालें करितां आम्ही हिंदुपदपादशाहीच्या ध्येयाचा खून करून रजपुत राजेरजवाड्यांच्या भांडणांत शिरलों, ' असलें अमंगळ उत्तर दिल्यावांचून मराठयांना सोयच नाहीं. बरें, हे भांडणांत पडूं नव्हेत, पडले; पण तेथें त्यांनीं साधा व्यवहार तरी पाळला का ? तोहि नाहीं. इंग्रजांनीं महमदअल्लीचा जो पक्ष स्वीकारला तो शेवटास नेला. तेथें आज महमदअल्ली तर उद्यां त्याचा प्रतिस्पर्धी चंदासाहेब असला अव्यवहार्य प्रकार तरी त्यांनीं केला नाहीं. मराठयांनीं असला साधासुधा व्यवहारहि पाळूं नये याला काय नांव द्यावें ? " किंवा पान १४ वर "पादशाही बुडविण्याकरितां निर्माण झालेली मराठशाही तिला सावरीत असल्याचा यानंतरचा देखावा तिच्या मूळ ध्येयास मूठमाती देऊन पंचवीस वर्षांच्या उद्योगावर एका दृष्टीनें पाणी पाडणारा वाटतो. " हे श्री. पुरंदरे यांचे उद्गार त्यांच्या निर्भीड वृत्तीचे द्योतक आहेत. तसेंच शिवाजीच्या मृत्यूनंतर झालेल्या मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाबद्दल लिहितांना, "श्रीशिवरायांचे उभयता पुत्र त्यांची वीर स्नुषा व त्यांचे शिष्यप्रशिष्य यांची यावेळची करामत महाराष्ट्रेतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिली जाईल" हे त्यांचे उद्गारहि अवास्तव नाहींत. खुद्द पुरंदरे घराण्यांतील पुरुषांसंबंधीं लिहितांनाहि पुरंदऱ्यांचा सर्वत्र पुरस्कार केलेला आढळत नाहीं. महादोबा पुरंदरे व नानासाहेब पेशवे यांच्यामधील तंट्यासंबंधीं लिहितांना "पण यजमान कारभार करण्यास जसजसा समर्थ होत जाईल तसतसा आपला हात कारभारांतून काढीत काढीत यजमानास संपूर्ण अधिकार देण्याचें धोरण या दोन्ही गोष्टी दिवाणांनीं अमलांत न आणल्यामुळें दोघानांहि फजीत पावावें लागलें" ( पान ४६ ). ह्या वाक्यानें त्यांनीं महादोबाच्या अधिकारलोलुपतेबद्दल योग्य ती टीका केली आहे.

प्रस्तावनेंतील एकंदर मजकूर वाचीत असतां त्यांत एकसूत्रीपणाचा अभाव दृष्टीस पडतो. निरनिराळ्या उपस्थित होणाऱ्या मुद्यांचें त्रोटक विवेचन घाईघाईनें करून लेखक पुढें जात आहे असें स्पष्ट दिसतें. किंबहुना प्रस्तुत पत्राच्या प्रकाशनामुळें पुढें येणाऱ्या मुद्यापुरतें विवेचन करण्यापलीकडे आपली जबाबदारी नाहीं असें लेखकास वाटत असल्याचें स्पष्ट दिसून येतें. पानिपत प्रकरणावर मात्र लिहीतांना श्री. पुरंदरे यांनीं अधिक विस्तार केला आहे व त्याचकरितां त्यांनीं इतर बाबतींत त्रोटकपणा स्वीकारून ' आवरितों मी बळेंचि रसनेला ' ही प्रो. पोतदार यांनीं उपप्रस्तावनेंत वर्णिलेली वृत्ति प्रकट केली आहे. परंतु या कठीण प्रसंगांतून पार पाडतांना ते मार्मिक टीकाकारांच्या परीक्षेस उतरणार नाहींत अशी भीती वाटते. पान ४८ वर ' तेव्हां बादशाहींतलि सबळ अशा नजिबाच्या पक्षाशीं **प्रामाणिकपणें** मराठे सहकार्य करीत राहते तर त्यांचा बराच फायदा झाला असता असें पुढील उद्योगावरून स्पष्ट दिसतें ' हें विवेचनाच्या प्रारंभींच ठोकून दिलेलें विधान वाचून वाचक स्तंभित होतो. कारण 'ऐसियास नजीब पुरा बेइमान...गतवर्षीं दादाशीं त्याची मजा राहिली नाहीं ' वगैरे **अस्सल पत्रांतील पुराव्यापुढें** श्री. पुरंदरे यांचें वर उद्धृत केलेलें **अनुमान** कसें टिकावें याचा त्यांच्यापुढें प्रश्नच पडतो. दिल्लीस स्थापन होत असलेलें मराठयांचें वर्चस्व उलथून पाडण्यांत सूत्रधार कोणी असेल तर नजीबखान होय. हें श्री. पुरंदरे यांच्यासारख्या विद्वान् अभ्यास-

कास मी सांगावयास पाहिजे असें नाहीं. काशीराजाची बखर वाचणारास अबदाली व वजीर यांचें सूत्र जुळवून देण्यांत नजीबाचें किती अंग होतें हें सहज कळून येण्यासारखें आहे. परंतु श्री. पुरंदरे यांना इंग्रजी ज्ञानाचें अंग नसल्यामुळें त्यांच्या अनुमानांत कांहींसा कमीपणा आला तर तो क्षम्य होय हें नमूद करणें न्यायाचें होईल. आजपर्यंत पानिपत प्रकरणाबद्दल अनेकांनीं लिहितांना अनेक ऐतिहासिक व्यक्तींची खरीखोटी तरफदारी केलेली आहे व या ना त्या व्यक्तीवर दोषाचें खापर फोडलें आहे या बाबतींत पुराव्याच्या अभावामुळें वाचक जितका घोटाळ्यांत पडतो तितकाच किंबहुना त्याहूनहि अधिक या कमी अधिक तरफदारीमुळें वाचकांची दिशाभूल होते. याप्रसंगीं एक महत्वाचा इशारा संशोधक वर्गास देऊन ठेवणें इष्ट वाटतें तो हा कीं निरनिराळीं दप्तरें व पत्रें प्रकाशित करतांना त्यामुळें जेवढी **नवीन** माहिती उपलब्ध होईल तेवढीच प्रामुख्यानें जगापुढें मांडावी. त्या माहितींत आपल्या बऱ्यावाईट मह्यांचा रंग भरीत बसल्याचा मोह टाकल्यास नूतन अभ्यासकाचे बरेच श्रम वाचतील. हा मोह आजिबात टाळणें होत नसेल तर नूतन कागदपत्रांशीं संबद्ध असलेला मुद्दा वेगळा काढून तेवढ्यावरच आपलें विवेचन मर्यादित करणें सुरक्षितपणाचें होईल. पुरंदरे दप्तराच्या प्रकाशनानें पानपत प्रकरणांतील दोनच मुद्यांवर विशेष प्रकाश पडतो. एक भाऊसाहेबानें शेवटच्या क्षणापर्यंत अबदालीशीं निकराचा सामना देण्याचें टाळलें याचें कारण त्यास नानासाहेबाचीं दक्षिणेहून 'मापमार्सी' येऊन पोहोचतों अशीं आश्वासनाचीं पत्रें येत होतीं हें होय. एवढ्यावरूनच भाऊनें शेवटपर्यंत दम धरणें योग्य होतें कीं नाहीं हा प्रश्न स्वतंत्र असून श्री. पुरंदरे यांच्या मताप्रमाणें सर्वच लेखक भाऊस त्या दोषांतून मुक्त करतील असें समजण्याचें कारण नाहीं. दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे पानिपत झाल्यावर देखील नानासाहेबानें पडती बाजू सावरण्याचा जो यत्न केला त्याचें विस्तृत वर्णन या पत्राइतकें दुसरें कोठेंहि आढळून येत नाहीं. हीं पत्रें वाचून मराठ्यांच्यामध्यें इतर कांहींहि दोष असले तरी ते मोठे धीराचे व न डगमगणारे लोक होते. पानपतच्या धक्क्यामुळेंहि ते बावरून गेले नाहींत या आजपर्यंत निघत गेलेल्या अनुमानास पुराव्याची बळकटी मिळते व अनुमान हें केवळ कल्पनेचें अनुमान न राहतां भक्कम पुराव्यावर बांधलेल्या 'तर्कांच्या' सदरांत जातें. याखेरीज नजीबखानाबद्दल श्री. पुरंदरे यांनीं लिहिलेल्या वाक्यांचें समर्थन करण्यास पुरंदरे दप्तरांत तरी पुरावा आढळत नाहीं.

उपजातींतील वादांच्या उल्लेखास श्री. पुरंदरे यांनीं कांहींसें अवास्तव महत्त्व दिलें आहे असें म्हणावेसें वाटतें. पान ४८ वर "महादोबाच्या पत्रांतील 'श्रीमंतास आपल्या जातीचा अभिमान फार' यांत सत्यांश असेल तर उत्तर पेशवाईंत राज्यकारभारांत पदोपदीं नडणारा देशस्थ कोकणस्थ वाद मूळ नानासाहेबाच्या 'कारकीर्दीत' उत्पन्न होऊन त्याचें जनकत्व खुद्द नानासाहेबाकडे जातें" ह्या वाक्यांतील 'जरतारी' वेष्टनानें मर्यादित करून सूचित केलेल्या तर्कास अवास्तव महत्त्व दिलें आहे. असेंच म्हटलें पाहिजे. कारण नानासाहेबानें वाखारे या देशस्थ घराण्याशीं शरीरसंबंध केला होता हें प्रसिद्ध आहे व ज्यावेळीं महादोबानें हे उद्गार काढले त्यावेळीं त्याचें व नानासाहेबांचें मांडण होतें तेव्हां या 'अव्वल दर्जाच्या' एकतर्फी ऐतिहासिक साधनावर सर्वस्वीं विसंबून राहतां येत नाहीं' (पान ४२) हे श्री. पुरंदऱ्यांचेच शब्द मी त्यांच्या लक्षांत आणून देतों. पान २४।२५ वर संशोधकाची स्थिति कशी असते याचें वर्णन देतांना ते म्हणतात.

" संशोधकांची कित्येक वेळां 'इकडे आड व तिकडे विहीर' अशी शोचनीय स्थिति होत असते. त्यांतले त्यांत सामाजिक पत्रव्यवहार हातीं आला असतां फारच त्रास होतो. हातीं आलेला कागद महत्त्वाची हकीकत देत असल्यानें तो नाइलाजास्तव प्रसिद्ध करावा लागतो. तसें न केल्यास कर्तव्यभ्रष्टता पदरीं पडते, बरें प्रसिद्ध करावा तर त्यामुळें कित्येक रुष्ट होतात. असा पेच असल्यानें

सामाजिक पत्रव्यवहार प्रसिद्ध करून शिव्याशाप खाण्याचें पूर्वीच्या पिढींतील संशोधकांच्या नशिबीं आलें. आम्ही तोच व्यवहार पत्करला असल्यानें त्या शेलापागोट्याचा अव्हेर करून आमचें कसें बरें चालणार ? ''

या संशोधकाच्या कैफियतीस उत्तर येवढेंच कीं संशोधित पुराव्यावरून तर्क काढतांना त्यांत आपल्या पूर्वग्रहाचा संशोधकानें संस्कार होऊं न देण्याची जागरूक खबरदारी घेत गेल्यास व पूर्वी चालत आलें म्हणून आजहि आम्ही तेंच चालविणार अशा हट्टाच्या वृत्तीचा त्याग केल्यास विनाकारण 'शेला पागोट्याचा अहेर' स्वीकारण्याची संशोधकास यातायात पडणार नाहीं ! वरील उतारा ज्या कलमांत दिला आहे त्या २७ व्या कलमाच्या अखेरीस 'बरेच दिवस राजवाडे व ज्ञानकोशकार यांच्या लिहिण्यामुळें चिघळलेल्या देवरुखे प्रकरणाचा शेवट गोड करण्याचें श्रेय परमेश्वरानें मंडळाकडेच दिलेलें पाहून आनंद होतो ' असे लेखकांनीं जे उद्गार काढले आहेत ते निराधार आहेत हें मी त्यांच्या नजरेस आणतों. या प्रकरणाशीं संबंध असलेल्या ले. १४६ मध्यें, देवरुखे ब्राम्हण, पूर्वी यादवभट नांवाच्या प्रसिद्ध शास्त्र्यानें 'पांक्त' आहेत असें ठरविलें असतां फिरून चितपावन कऱ्हाडे ब्राह्मण तो निर्णय त्याजकडून फिरवून घेण्याची खटपट करीत आहेत तेव्हां 'सारांश ज्ञातीचा धंदा आहे. स्वामींनीं येविसी मन घालून कार्य करून दिले पाहिजे' असें चिमाजी आप्पा बाजीरावास आग्रहानें लिहीत आहे असें दिसतें. येवढ्यावरून हा वाद पुढें केव्हांहि निघाला नाहीं म्हणून 'एव्हांपासून चितपावन कऱ्हाडे व देवरुखे यांत कोकणांतहि भोजनादि प्रकार सुरू झाला असावा' हें निसटतें अनुमान लेखकांस काढतां येणार नाहीं. या प्रकरणीं बाजीरावाचा निर्णय काय झाला तें कळेपर्यंत अनुमान काढण्याची व अनुषंगानें मंडळाची पाठ थोपटण्याची घाई करूं नये हें उत्तम.

अशा रीतीनें प्रस्तावनेंतील अनेक मुद्यासंबंधीं माझा लेखकाशीं मतभेद असला तरी प्रस्तावना वाचनीय झाली आहे हें निर्विवाद होय. संशोधनग्रंथांस प्रस्तावनेचा प्रवेश आवश्य आहे. कारण बहुतेक वाचक त्या प्रस्तावनेपलीकडे किंवा फारतर त्या प्रस्तावनेंत उल्लेखिलेल्या पत्रापलीकडे जात नाहींत. कै. राजवाडे यांनीं खं. १५ व खंड २० वगैरे खंडास प्रस्तावना न लिहिल्यानें नूतन अभ्यासकाची त्या फारशी प्रचुर पत्राशीं झगडतांना काय तारांबळ उडते तें प्रत्यक्ष अनुभव असणारांसच माहीत. या दृष्टीनें इंग्रजीचें ज्ञान नसतांहि श्री. पुरंदरे यांनीं मांडलेला आटोप त्यांस सर्वस्वीं भूषणावह आहे यांत शंका नाहीं. पुरंदरे दप्तराच्या प्रकाशनानें पेशवाईच्या अंतरंगावरील पडदा दूर झाला आहे. कर्तृत्ववान पेशवे, स्वतंत्र वृत्तीचे सरदार व चंचल शाहू यांच्या तिरंगी सामन्यांत पेशव्याची कशी तारांबळ उडे याचें चित्र या पत्रांतून स्पष्ट दिसतें. त्यांत आणखी कर्जाच्या बोजानें पेशवे कसे सतावले जात हेंहि कळून येतें. नानासाहेब व शाहू यांच्यांत प्रसंगोपात्त खटका उडे हें आपणांस प्रथमच या दप्तरांतून कळतें. बाजीरावाच्या मनःस्थितीवर ब्रह्मेंद्रस्वामीशीं झालेल्या पत्रव्यवहारानें बराच प्रकाश पडला होता. परंतु त्यांत या पत्रामुळें अधिक महत्त्वाची भर पडली यांत शंका नाहीं. श्री. पुरंदरे यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत पुरंदरे घराण्याची थोडक्यांत प्रारंभीं हकीकत दिली असती तर मूळ पत्रें वाचतांना त्यांत येणाऱ्या व्यक्तींच्या नांवावर विशेषतः टोपण नांवावर वाचक पदोपदीं अडखळला नसता. दिलेलीं पत्रें कालानुक्रमानें छापलीं आहेत यावद्दल संपादकाचे आभार मानले पाहिजेत. कारण पुष्कळ वेळां या साध्या गोष्टीचीहि काळजी संशोधकांकडून घेतली गेल्याचें आढळून येत नाहीं. याच्या भरीस पत्रांत येणाऱ्या कठीण शब्दांचा कोश जोडला असता तर सामान्य वाचकावर अधिक उपकार झाले असते. पुस्तकांत प्रस्तावनेंत व पत्रांत ब्राह्मण शब्द अनेक ठिकाणीं 'ब्राम्हण' असा अशुद्ध चुकीनें राहून गेला आहे त्याची पुढील वेळेस खबरदारी घ्यावी. असो. श्री. पुरंदरे यांनीं दप्तरप्रकाशनाचा आपला उद्योग झपाट्यानें चालू ठेवून अनेक दप्तरें प्रसिद्ध करावीं अशी त्यांस विनंति करून हें कांहींसें लांबलेलें परीक्षण पुरें करतों.

# पुस्तकपरीक्षण

( लेखकः— के. ल. ओगले )

रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें चरित्र भाग १ आणि २. ( लेखकः— श्री. **गणेश रामकृष्ण हवालदार**, बी. ए. एल्एल् बी. मुंबई. किंमत साडेतीन रुपये. )

नियमितपणा आणि करारीपणा यांविषयीं ज्यांचें नांव म्हणीसारखें सर्वतो मुखीं झालेलें आहे त्या सुप्रसिद्ध रावसाहेब मंडिकांचीं त्रोटक चरित्रें आजवर कित्येक झालेलीं आहेत; पण त्यांच्या आयुष्यक्रमाचें साग्र वर्णन करणारें त्याचें विस्तृत चरित्र महाराष्ट्रभाषेंत होणें अवश्य होतें. ती उणीव त्यांचे आप्त रा. गणेश रामकृष्ण हवालदार बी. ए. एल्एल्. बी. यांनीं भरून काढण्याचा या पुस्तकाच्या द्वारा प्रयत्न केला आहे. रा. हवालदार यांनीं पूर्वी होमरचें इलियड काव्य पोपकृत इंग्रजी रूपान्तरावरून मराठींत कवितारूपानें आणिलें असून तें अशाच दोन भागांत प्रसिद्ध केलें आहे. या गोष्टीचा प्रस्तुत परीक्षणांत उल्लेख करण्याचें कारण एवढेंच कीं त्यावरून ग्रंथकारांच्या मेहनतीपणाची कल्पना यावी. ग्रंथकारांनीं याहि ग्रंथांत रावसाहेब मंडलिकांचें दप्तर चाळण्यांत फार श्रम केलेले दिसतात. रावसाहेब मंडलिक म्हणजे व्यवस्थितपणा, नियमितपणा आणि उद्योगशीलता यांचा आदर्श असल्यामुळें त्यांचें दैनिकवृत्तलेखन आणि पत्रव्यवहार अत्यंत काळजीपूर्वक ठेविलेला असणें साहजिक आहे. तेव्हां त्यांच्या चरित्रविषयक सामग्रीसंबंधानें कुरकूर नाहीं. त्या सामग्रीचा योग्य उपयोग करून चरित्राची नीट जुळणी करणारा योजक पाहिजे होता. तें योजकत्व रा. हवालदारांनीं आपल्याकडे घेऊन यथामति काम केलें आहे.

रावसाहेब मंडलिक हे सार्वजनिक रीत्या रावसाहेब या नांवानें प्रसिद्ध असले तरी त्यांचा कोंकणांतील रहाण्याचा गांव जो मुरुड त्यांत व त्यांचे संबंधी, आप्त, इष्टमित्र व चहाते यांच्यांत ते अण्णा मंडलिक या नांवानें ओळखिले जात. त्यांच्यासंबंधानें अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत, पण त्यांचा या चरित्र ग्रंथांत अर्थातच समावेश केलेला नाहीं. पण अलीकडे आठवणी व आख्यायिका प्रसिद्ध करण्याची जी पद्धत पडली आहे, तिला अनुसरून रावसाहेब मंडलिकांच्या आठवणी व आख्यायिका कोणी प्रसिद्ध करील तर फार चांगलें होणार आहे. मंडलिकांचा मोठेपणा इतका सर्वव्यापक होता कीं त्यांच्या आठवणी व आख्यायिका या फारच बोधप्रद होतील. पण प्रस्तुत त्या प्रसिद्ध करण्याच्या कामीं मोठी अडचण म्हटली तर त्या सांगणाऱ्या माणसांची वाण ही आहे. रावसाहेब मंडलिकांच्या बरोबरीची पिढी आतां बहुतेक संपत आली असून त्यांना पाहिलेली मंडळी देखील आतां कमी कमी होत आहेत. यामुळें त्यांच्या आठवणी व आख्यायिका या जरी मिळाल्या तरी त्या सर्वस्वीं विश्वसनीय असतीलच असें नाहीं. तरी असा प्रयत्न कोणी केल्यास अद्यापि त्याला कांहीं सामग्री मिळण्यासारखी आहे.

रावसाहेब मंडलिकांचा जन्म ८ मार्च १८३३ या दिवशीं होऊन ते ९ मे १८८९ या दिवशीं दिवंगत झाले. ५६ वर्षांचें आयुष्य त्यांच्यासारख्या सुस्थितींत वाढलेल्या व पराकाष्ठेच्या व्यवस्थितपणें वागणाऱ्या गृहस्थास फारच थोडें झालें असें वाटल्यावांचून रहात नाहीं. आधुनिक भारताचे महनीय पितामह अशी पदवी ज्यांना यथार्थ मिळाली ते दादाभाई नौरोजी रावसाहेबांच्या बरोबरीचे कार्यकर्ते पण वयानें रावसाहेबांहून वडील. त्यांना सुदैवानें पुरेसें

आयुष्य लाभलें पण हिंदुस्थानांत कर्तबगारीच्या, शूर, उद्योगशील अशा देशभक्तास सामान्यतः अल्पायुष्यच प्राप्त झालेलें दिसतें व मंडलिकांसारखा अत्यंत व्यवस्थित देशभक्तहि त्या सामान्य नियमाला अपवाद ठरला नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट होय.

रावसाहेब मंडलिकांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमास विद्यार्थिदशा संपल्याबरोबर लगेच आरंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. सार्वजनिक कार्याचे अनेक प्रकार असतात. समाज-सेवा, वाङ्मयसेवा, इत्यादि कार्यें सरकारी नोकरींतहि करतां येतात. पण राजकारण मात्र परकीय अमलाखालीं नोकरींत राहून करणें अशक्य असतें. तथापि हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याची स्थिरस्थावर झाल्यावर कांहीं काळ असा होता कीं मनुष्याच्या मनांत असल्यास नोकरींत राहून त्याला राजकारणाचे कांहीं वळसे लोकांना देण्याची थोडीबहुत सोय होती. ही स्थिति अर्थातच थोडा काळ टिकणारी असून त्या काळांतहि कांहीं विशिष्ट बुद्धीच्या माणसांनाच तसें काम करतां येई. याचें कारण त्यावेळीं राज्यकर्त्यांना अशा माणसांच्या निरुपद्रवी राजकारणाची थोडी-बहुत गरजच वाटत असे हें होय. पण या राजकारणाच्या सरड्याची धांव कुंपणापर्यंतच असल्यामुळें खऱ्या कर्तृत्वशाली पुरुषाला सरकारी नौकरींत शेवटपर्यंत समाधान वाटणें शक्य नसतें. रावसाहेब मंडलिक विद्यार्थिदशा संपवून पुढील मार्गास लागण्याच्या सुमारास असा काळ होता कीं कर्तृत्ववान् पुरुषाला सरकारी नोकरींत शिरल्यानें स्वहित व लोकहित साधेल असें प्रथम तरी वाटावें. यामुळें त्यावेळीं बहुतेक इंग्रजी शिकून परीक्षा पास झालेले लोक सरकारी नोकरीच्या बाहेर फारसे दिसत नाहींत. पण सरकारी नोकरींत गेल्यावर स्वहित कदाचित् पूर्णपणें साधलें तरी लोकहित साधावें तसें साधणें अशक्य आहे असाच अनुभव सर्वांस आलेला असला पाहिजे. रावसाहेब मंडलिकांस तसा अनुभव आला इतकेंच नव्हे तर स्वहित साधण्या-चीहि विशिष्ट मर्यादाच सरकारी नोकरींत असते हेंहि त्यांना कळून आलें व म्हणून स्वतंत्र उद्योगाचे त्यांनीं कित्येक प्रयत्न करून शेवटीं वकिलीचा आश्रय केला.

रावसाहेब सरकारी नोकरींत अगदीं अल्पवयी म्हणजे अवघे १९ वर्षांचे असतांनाच शिरले व प्रथम त्यांना जी जागा मिळाली ती मानाची, हुद्याची किंवा मोठ्या पगाराची होती असेंहि नाहीं. रावसाहेबांची बुद्धिमत्ता सामान्य प्रकारची नव्हती व ती त्यांचें इंग्रजीचें उच्च शिक्षण चाललेलें असतांच अध्यापकांच्या दृष्टोत्पत्तीस आली होती. युरोपिअन अधिकाऱ्यांच्या नजरेस येण्यास रावसाहेब मंडलिकांना प्रथम ही बुद्धिमत्ताच उपयोगी पडली. ते वडया अधि-काऱ्यांच्या डोळ्यांत भरले तें त्यांच्या कर्तृत्वामुळें नव्हे, तर केवळ उत्तम बुद्धिवान् व शीलवान विद्यार्थी म्हणून. त्यांच्या कर्तृत्वशक्तीला दृश्यरूप आलें तें त्यानंतर आणि तेंहि विशेषतः नोकरी सोडून त्यांनीं वकिलीचा स्वतंत्र धंदा स्वीकारल्यानंतरच होय. पण त्यांच्या प्रसिद्धीला त्यांच्या कर्तृत्वापेक्षांहि त्यांच्या करारी स्वभावानें व नियमितपणानेंच विशेष साह्य केलें.

रावसाहेबांचें कर्तृत्व विविध होतें. ते वाङ्मयसेवक होते, राजकारणी होते आणि समाज-सुधारकहि कांहीं मर्यादेपर्यंत होते. केवळ गोष्टी, कादंबऱ्या, नाटकें सोडिलीं तर सर्व प्रकारच्या वाङ्मयाशीं व मागाहून हिंदु धर्मशास्त्रविषयक वाङ्मयाशीं त्यांनीं उत्तम परिचय करून घेतला होता व हिंदुधर्मशास्त्रावर त्यांनीं ग्रंथलेखनहि केलें आहे. मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति, व्यवहार-मयूख इत्यादि धर्मशास्त्रविषयक ग्रंथ त्यांनीं संपादिले असून त्यांवर चिकित्सात्मक निबंध लिहिले व त्यांमुळें त्यांची यूरोपमध्येंहि पंडितांत चांगलीं प्रसिद्धि झाली. ते प्राचीनविद्या-संशोधक असून तत्संबंधीं त्यांची कामगिरी रायल एशियाटिक सोसायटीच्या इतिहासांत नमूद आहे. या त्यांच्या कामगिरीमुळें अनेक प्राचीनविद्यासंशोधक संस्थांचें सभासदत्व त्यांना प्राप्त झालें व दूरदेशींहि त्यांची ख्याति झाली.

रावसाहेब हे समाजसुधारक होते, पण समाजाला सर्वस्वीं सोडून स्वतंत्रपणें सुधारणांचा टेंभा पाजळीत फिरणारांपैकीं ते नव्हते. त्यांची समाजसुधारणा धर्मशास्त्राच्या मर्यादेंत होती. स्त्रीशिक्षण, परदेशगमन इत्यादि गोष्टींत ते प्रचलित रूढि टाकून देण्याच्या मताचे होते. थोड्या निराळ्या दृष्टीनें पाहिलें तर आज अकोला-ब्राह्मण-परिषदेच्या ठरावांना त्यांची संमति मिळाली असती व काशीच्या संमेलनाशीं त्यांचा खटका उडाला असता असें म्हणतां येण्यासारखें आहे. पण आज ज्यांना पूर्णपणें सुधारक म्हणतां येईल अशांत त्यांची आचारानेंच काय पण विचारानेंहि गणना करतां येण्यासारखी नाहीं. त्यांचा धर्मशास्त्रावर मोठा भर व श्रद्धा असे. पण धर्मशास्त्र म्हणजे कांहीं धर्मशास्त्रांतील उतारे व रूढी यांची एकवाक्यता करून खिचडीवजा सिद्ध केलेले आधुनिक निबंधग्रंथ एवढेंच नसून धर्मशास्त्राची वाढ प्राचीनकालापासून होत आली आहे व त्याच्यामागें कांहीं तत्त्वें आहेत असें त्यांचें मत दिसतें. यामुळें कांहीं प्रचलित रूढींच्या विरुद्ध जाण्यास ते कचरत नसत. उदाहरण, एकदां ते आपल्या गांवीं म्हणजे मुरूड येथें असतां सोहेरांत त्यांनीं श्मश्रु करविला. ती वार्ता ऐकून भिक्षुक मंडळींत गडबड झाली व थोड्याच दिवसांनीं त्यांच्याकडे कांहीं धर्मकार्य असतां जमलेल्या ब्राह्मणमंडळींत त्याविषयीं आक्षेपपूर्वक चर्चा चालू झाली. ही गोष्ट रावसाहेबांच्या कानावर गेल्यावर लगेच त्यांनीं त्या ब्राह्मणांस आव्हान करून सोहेरांत श्मश्रु न करण्याविषयींचा धर्मशास्त्रविषयक निषेध काढून दाखविण्यास सांगितलें. भिक्षुक ब्राह्मणांत सामान्यतः धर्मशास्त्र वरवरहि पण मूळांतून जाणणारा माणूस आधीं क्वचित्. त्यांतून रावसाहेबांसारख्या धर्मशास्त्रपारंगताशीं गांठ. मग ते ब्राह्मण काय करणार ? ती आक्षेपयुक्त चर्चा बंद होऊन धर्मकार्य उरकलें. या उदाहरणावरून रा. सा. मंडलिकांच्या समाजसुधारणेची दिशा कोणती होती तें लक्षांत येईल. पण एकंदरींत आजच्या सामान्य सुशिक्षितांच्या दृष्टीनें पाहिल्यास रावसाहेब मंडलिक जुन्या वळणाचे कर्मठ वाटतात, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. शास्त्राला अविरुद्ध असे आचार रूढीनें बंद केले असले, तर तें बंधन पाळण्याची जबाबदारी आपल्यावर नाहीं, पण शास्त्राच्या विरुद्ध आचरण करूं नये असें त्यांचें मत होतें व त्याप्रमाणें वागण्याचें धैर्यहि त्यांच्यांत होतें. पण त्यांनीं कांहीं गोष्टी रूढी-विरुद्ध केल्या तरी धर्मशास्त्राला मान देण्याची त्यांची उत्कट इच्छा असल्यामुळें व त्यांच्या इतर मोठेपणामुळेंहि समाजानें त्यांच्याविरुद्ध कित्येक वेळां कुरकूर केली, तरी त्याला मोठेंसें काहूर त्यांच्यावर उठवितां आलें नाहीं.

आतां मंडलिकांच्या राजकारणविषयक कार्याचा विचार करावयाचा. रा. ब. गोपाळराव हरी देशमुख म्हणजे सुप्रसिद्ध लोकहितवादी यांचेहि राजकारणविषयक विचार फार प्रगल्भ होते असें त्यांच्या कित्येक लेखांवरून दिसतें. पण त्यांचा जन्म सरकारी नोकरींत गेल्यामुळें टोपण नांवानें लेख लिहिण्यापलीकडे प्रत्यक्ष लोकहिताचें काम त्यांना फारसें करतां आलें नाहीं. पण रावसाहेब मंडलिकांनीं स्वतंत्र धंदा करून लौकिक व पैसा पुष्कळ मिळविल्यामुळें त्यांना राज-कारणाच्या दृष्टीनें लोकहिताचें काम बरेंच करतां आलें. हें सर्व राजकारण अर्थात् इंग्रजी अंमलांतील पहिल्या हिंदी पुढाऱ्यांच्या वर्गांतील होतें. या राजकारणाच्या मार्गे इंग्रजलोकांवरील अढळ निष्ठा हीच प्रेरक होती. या दृष्टीनें पाहिल्यास मंडलिक आचरणांत कडक व भाषेंत सडेतोड असले, तरी नेमस्तांतील अव्वल दर्जाचे नेमस्त हीच त्यांची खरी पदवी होती. पण त्या काळाच्या मानानें हेंहि कांहीं थोडें नव्हतें. पुष्कळ वेळां नेमस्त व जहाल शब्दांची निष्कारण ओढाताण करण्यांत येते, व खऱ्या नेमस्ताला जहाल व खऱ्या जहालाला नेमस्त म्हटलें जातें. हा जो फरक पडतो तो कशांत नेमस्त व कशांत जहाल हें पहाण्याच्या दृष्टीमुळें पडतो. प्रसंग पाहून सामदामाची उपाययोजना करणें एवढ्यानेंच मनुष्य नेमस्त होत नाहीं. त्याच्यामागें

एक विशिष्ट मनोभूमिका लागते, आणि ती म्हणजे विरोधीपक्षाच्या न्यायीपणावरील निष्ठेची होय. ही निष्ठा ज्याच्यापाशीं मुळींच नाहीं, विरुद्धपक्ष अवश्य ते सर्व प्रकारचे उपाय आपल्या-वर सोडण्यास केव्हांहि कचरणार नाहीं, हें ओळखून वागण्याची प्रवृत्ति ही जहालवृत्तीची मनो-भूमिका होय. या दृष्टीनें पाहिल्यास रावसाहेब मंडलिक इंग्रजी अधिकाऱ्यांशीं वागतांनाहि जरी अगदीं कडक शिस्त बाळगीत तरी ते राजकारणी जहाल नव्हते. इंग्रजांना आपल्या गरजा कळवून त्यांची खात्री केल्यास आपलें इष्ट त्यांच्याकडून पुरविलें जाण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं अशी त्यांची निष्ठा असून खासगी व सार्वजनिक अशा अनेक प्रसंगीं त्यांनीं ती व्यक्त केलेली आढळते.

सरकारी अधिकाऱ्यांनीं ही त्यांची मनोभूमिका पूर्णपणें ओळखिली होती आणि म्हणूनच कदाचित् त्यांच्या कार्यांत त्या अधिकाऱ्यांकडून मंडलिकांना उत्तेजन मिळत गेलें. पूर्वी सांगितल्याप्रमाणें तो काळच असा होता कीं त्यावेळीं खऱ्या राजनिष्ठेचें बीं समाजांत पेरून किरकोळ दुःखें दूर करण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसांची सरकारला गरज होती. तेव्हां मंडलिक, नानाशंकरशेट अशीं प्रजेंतील वजनदार माणसें जवळ करण्याची व त्यांच्या सल्ल्याला प्रसंगीं मान देण्याची अधिकाऱ्यांची प्रवृत्ति स्वार्थमूलकच होती यांत शंका नाहीं. गव्हर्नर साहेबांचें बोलावणें आलें असतांच काय, पण प्रत्यक्ष युवराजांच्या कार्यक्रमासाठींहि आपला ठरीव कार्यक्रम सोडण्याला नाखुषी दर्शविणाऱ्या मंडलिकांचा सरकारी अधिकारी बोज राखीत असत. याचें इंगित सरकारच्या त्या वेळच्या एका प्रकारच्या गरजूपणांतच शोधिलें पाहिजे. तात्पर्य, करारीपणाचा गुण रावसाहेब सरकारी अधिकाऱ्यांपासून शिकले व अधिकाऱ्यांनींहि त्यांच्या करारीपणाचें चीज करण्याचें ठरविल्यामुळें त्या गुणाचा विशेष गाजावाजा झाला. मंडलिकां-सारखा मनुष्य आजच्या स्थितींत करारीपणा दाखवूं लागेल तर त्याचा मानभंग अधिकाऱ्यां-कडून पदोपदीं झाल्यावांचून राहणार नाहीं, इतकेंच नव्हे तर नसतीं कड्याळेंहि त्याच्याविरुद्ध उपस्थित केलीं जाण्याचा संभव आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर रावसाहेब मंडलिकांच्या अंगीं मोठेपणास लागणारे गुण जे होते त्यांचा पुरस्कार सरकारी अधिकाऱ्यांकडून त्या युगांत झाला व त्यामुळें मंडलिकांचा मोठेपणा खुलून दिसूं लागला. पण कारणें कांहीं असलीं, परिस्थिति अनुकूल होती असें म्हटलें तरी रावसाहेब मंडलिक हे थोर व अनेक गोष्टींत अनुकरणीय पुरुष होऊन गेले यांत तिळप्राय शंका नाहीं. अशा अनुकरणीयचरित थोर पुरुषाचें सविस्तर चरित्र लिहून प्रसिद्ध केल्यानें रा. हवालदार यांच्याकडून मोठी कामगिरी झाली आहे.

प्रस्तुत चरित्रग्रंथ फार विस्तृत म्हणजे ८६ प्रकरणांचा व साडेबाराशेंच्या वर पानांचा आहे व अर्थात् तो लिहिण्यांत ग्रंथकाराला बरेच परिश्रम करावे लागले असले पाहिजेत यांत शंका नाहीं. पण वाङ्मय या दृष्टीनें पहातां या ग्रंथाचा क्रम बराच खालीं लागेल. प्रथम त्यांत रचनाकौशल्य मुळींच दिसून येत नाहीं. त्यांतील विधानें आधाराशिवाय केलेलीं नाहींत हा जसा त्याचा गुण, तसा नकोत तेथेंहि आधार देत गेल्यानें भाषाप्रवाह, रसोत्पत्ति इत्यादिक साधण्याच्या बाबतींत पदोपदीं अडथळे आल्यामुळें एकंदर लेखनाला नीरसपणा आला आहे. भाषेच्या दृष्टीनें पहातांहि हा ग्रंथ आधुनिक विद्वानानें लिहिलेला नसून पन्नास पाऊणशें वर्षां-पूर्वीच्या मनुष्यानें लिहिल्यासारखा दिसतो. मराठी भाषेला प्रस्तुत जें गोंडस, जोमदार, रसाळ व सुसंबद्धवाक्यरचनायुक्त स्वरूप आलें आहे त्याचा या ग्रंथांत अभावच दृष्टीस पडतो. या-मुळें पुस्तक वाचीत असतां व वाचून झाल्यावर रावसाहेब मंडलिक म्हणून जी अपूर्व व्यक्ति होऊन गेल्याचा ठसा उमटावयास पाहिजे, तो वाचकाच्या मनावर उमटत नाहीं. हा ग्रंथ म्हणजे मंडलिकांच्या चरित्रांतील गोष्टींची लांबलचक व मधूनमधून प्रशंसोद्गारयुक्त जंत्री आहे.

या ग्रंथांतील भाषेची पद्धति पन्नास पाऊणशें वर्षांपूर्वीची आहे असें जें वर म्हटलें त्याचें प्रत्यंतर पाहिजे असेल तर 'कोडत' हा शब्द घ्या. या पुस्तकांत हा शब्द शेंकडों वेळां आला आहे. पण त्याचें सांप्रतचें रूप मूळ इंग्रजीप्रमाणें कोर्ट असेंच आहे. तेव्हां कोडत असें मुद्दाम रूप ठेवण्यांत आतां कांहीं स्वारस्य नाहीं. दुसरें प्रत्यंतर, वाक्यांतील कर्ता गाळण्याचें. याचीं उदाहरणें ग्रंथांत अनेक आढळतील. नमुन्यासाठीं कांहीं वाक्यें पहा. "एकदां रावसाहेबांच्या पोटांत दुखूं लागलें व त्यांस किंचित् ज्वरांशहि वाटला. **त्या दिवशीं फक्त सातूदाण्याची खीर खाऊन होते.** (पान ३९). गंजिफांनीं बापुसाहेब विनीवाले आले असतां एकदांच खेळले होते (पान ७१ ). याशिवाय सार्वजनिक कामांत लक्ष घालीत असत ( पा. ७१ ). व महालक्ष्मीच्या वाटेवर बंगला घेतल्यावर आपल्या जागेंत त्यांस बंगला बांधावयास जागा कांहीं शर्तीवर विकत देऊन आपल्या शेजारीं स्थापन करून घेतलें ( पान ३१७ ). परमहंस क्लबाचे प्रस्थापक होते ( पान ३१८ ). चित्रपटाचा समारंभ असल्यास कधीं कधीं जात ( पान ३२१ ). त्याचप्रमाणें शक्तीचे प्रयोग पहाण्यास जात असत (पान ३२१). मागें सांगितल्याप्रमाणें प्रयाणास मुहूर्त साधल्यास बघवीत असत व दुसऱ्यासहि सांगत असत (पान३२४). व मुलींच्या अज्ञानतिमिराचा नाश करण्याचें काम अद्यापीहि करीत आहे ( पान ३२७ ). तें पाहून फार निराशा झाली व म्हणाले ( पान ३२९ ). इ. इ.

ग्रंथकारांच्या भाषेवर शेंपाउणशें वर्षांपूर्वीच्या भाषेचा छाप बसलेला आणखीहि कांहीं बाबतींत दिसून येतो. दूरान्वय, अनवश्यक अशी संस्कृत शब्दयोजना, तुटक वाक्यरचना हे दोष अनेक ठिकाणीं दृष्टीस पडसात. उदाहरणार्थ, दूरान्वययुक्त वाक्यें पहा. "अशा विश्वविद्यालयाची स्थापना कंपनीसरकारच्या राज्यांतच बंडाचा उद्भव झाला होता व सर्व हिंदुस्थान शोकग्रस्त झालें होतें तरी झाली होती" (पान ३६७). "हें प्रकरण रावसाहेबांकडे कागद सांडल्याची शंका येऊन निर्णयार्थ आलें होतें" (पान ३७०). "हा मान कोणास द्यावा याविषयींचें मत रावसाहेबांनीं करून ठेविलेल्या फेलो नेमण्यास लायक अशा मनुष्यांच्या यादीवरून समजतें" ( पान ३७० ). इ. इ. "पुण्यवंताचा आर्यसंस्कृतीप्रमाणें अन्य तऱ्हेनें शेवट होणें शक्य नाहीं" ( पान ४५१ ). इ. इ. •

या ग्रंथांत ग्रंथकारांनीं प्रत्येक प्रकरणाच्या आरंभीं श्लोक, इंग्रजी वाक्य, असें कांहीं अवतरण घेण्याची पद्धत ठेविली आहे. अनेक इंग्रजी कादंबऱ्यांतून व इतर पुस्तकांतूनहि ती आढळते. प्रकरणांतील तात्पर्यार्थ दर्शनींच चटकन ध्यानीं यावा ह्या हेतूनें ही योजना केलेली असते ही गोष्ट खरी. पण हा हेतु साधणें फार कठीण असतें. सारींच अवतरणें अगदीं समर्पक असणें शक्य नसतें व अवतरणें समर्पक नसतील तर औचित्यभंगाचा दोष पदरीं येतो. तसा प्रकार अगदीं ढोबळ रीतीनें नसला तरी थोडयाबहुत प्रकारानें या ग्रंथांत घडल्याचें दिसतें. उदाहरणार्थ, मंडलिकांची मुंबईच्या विश्वविद्यालयासंबंधीं कामगिरी सांगणाऱ्या प्रकरणाच्या शिरोभागीं 'या कुन्देन्दुतुषारहारधवला' इत्यादि सुप्रसिद्ध सरस्वतीस्वरूपवर्णनाचा श्लोक घातला आहे तो पहावा. रेवेन्यु सर्वे बिलाविषयींच्या मंडलिकांच्या कार्याचें वर्णन देणाऱ्या प्रकरणावर 'ॐ नमः सिद्धम्' हें अवतरण घेतलें आहे; कां तर ही कामगिरी म्हणजे मंडलिकांच्या 'राजकीय भडयांचा ओनामा होता!'

या ग्रंथांत रचनाकौशल्याचा अभाव कसा आहे हें केवळ अनुक्रमणिका पाहिली तरी कळण्यासारखें आहे. रावसाहेब मंडलिकांसारख्या थोर पुरुषाचें चरित्र ल्याहावयाचें तें 'रावसाहेबांची उच्च पदवी प्राप्त करून घेणें आपणास शक्य आहे असा आत्मविश्वास वाचकांच्या मनांत उत्पन्न' व्हावा म्हणून जर असेल तर त्यांत ज्यांचें सार्वजनिक महत्त्व नाहीं अशा खासगी

स्वरूपाच्या कौटुंबिक हकीगती सविस्तर देण्याचें कारण नाहीं. त्या हकीगती चरित्रनायकाचें स्वरूप उठावदार दिसण्यासाठीं थोड्या फार प्रमाणांत अवश्य नाहींत असें नाहीं. पण जरूर तेवढाच त्यांचा प्रसंगोपात्त उल्लेख असावा. पण या ग्रंथांत तसें न करतां मंडलिकांची नोकरीची कामगिरी वर्णन करतांना मध्येंच 'सौ. अन्नपूर्णाबाई मंडलिक' हें प्रकरण आलें आहे. तसेंच पुढें त्यांची सार्वजनिक कामगिरी सांगतांना 'वक्तृत्वोत्तेजक सभे'च्या वृत्तान्तानंतर 'नानामंडलिकाचा प्रपंच, भाऊमंडलिक, रावजी मंडलिक, रावसाहेबांच्या मातोश्री, रावसाहेबांच्या पत्नीचा अंतरोग' अशीं स्वतंत्र प्रकरणें घातलीं आहेत. पुस्तक वाचतांना एका प्रकरणांतून दुसरें प्रकरण कसें उत्पन्न झालें हें अगदीं अपवाद खेरीज करून कोठें आढळत नाहीं. बहुतेक सारीं प्रकरणें एकमेकांपासून अलग आहेत. थोर व अनुकरणीय पुरुषाचें चरित्र नमुनेदार पहाणें असेल तर रा. आठल्ये यांनीं लिहिलेलें लोकमान्यांचें इंग्रजी चरित्र पहावें. पण प्रस्तुत चरित्रग्रंथांत विषयांची वर्गवारी न करतां खिचडी केलेली आहे. ग्रंथांतील ८६ प्रकरणांपैकीं पहिलीं पंधरासोळा प्रकरणें व शेवटचीं पांचसहा प्रकरणें यांत सामान्यतः कांहीं तरी पद्धत दिसून येते. तशीच इतरहि भागांत असती, तर बरें झालें असतें.

मंडलिकांच्या आयुष्यापैकीं नोकरीच्या भागानंतरहि कांहीं काळ त्यांच्यापाशीं द्रव्यनिधि फारसा होता असें दिसत नाहीं. १८६३ सालीं त्यांनीं वकिली चालू केली व १८८९ सालीं ते वारले. म्हणजे सरासरी २६ वर्षें त्यांची वकिली चालली. या सव्वीस वर्षांत त्यांची जी रहाणी होती ती संस्थानिकासारखी होती. अर्थात् तिला खर्चहि तसाच होत असला पाहिजे. त्यांच्या वकिलीविषयीं लिहितांना ग्रंथकार म्हणतात, 'रावसाहेबांचें कुळाजवळ मागणें फार बेतवार असे.' अशा बेतवार मागणीवर संस्थानिकासारखा चालू खर्च ठेवण्याचें व त्याशिवाय सामान्य मनुष्याला अप्राप्य इतकी मालमत्ता व द्रव्यनिधि सांठवून ठेवण्याचें काम त्यांना कसें करतां आलें याचा व्हावा तसा खुलासा प्रस्तुत ग्रंथांत नाहीं. त्यामुळें वाचक बुचकळ्यांत पडतो. पान १५९ वर त्यांच्या फीचें प्रमाण दिलें आहे. त्यावरूनहि इतका पैसा त्यांनीं जमविला कसा असाच प्रश्न पडतो. ही बाब अर्थात् मोठीशी महत्त्वाची नाहीं. मंडलिकांनीं पुष्कळ पैसा शिल्लक ठेवला व राजाप्रमाणें स्वतःची रहाणी ठेविली ही गोष्ट सत्य आहे. तर त्यांनीं तो पैसा मिळविला ही गोष्टहि तितकीच सत्य आहे पण चरित्रांत तिचा उल्लेख कांहीं केलेला नाहीं. मोठमोठ्या खटल्यांत बक्षिसाचा ठराव करण्याचा उल्लेख १६० पानावर आहे, तसेंच मत सांगण्यासाठीं ते ३० मोहोरा ४५० रुपये घेत, असेंहि सांगितलें आहे. तथापि त्यांच्या द्रव्यप्राप्तीसंबंधानें अधिक माहिती स्पष्ट शब्दांनीं द्यावयास पाहिजे होती असें हें पुस्तक वाचतांना वाटल्यावांचून रहावत नाहीं.

मंडलिक हे लोकांत रावसाहेब या पदवी नामानें प्रसिद्ध होते, पण ही पदवी त्यांना कशी मिळाली या गोष्टीचा खुलासा ७४ व्या प्रकरणापर्यंत या ग्रंथांत केलेला नाहीं. आरंभीं त्यांच्या नोकरीचा वृत्तांत देतांनाच या पदवीचा उल्लेख पाहिजे होता.

रावसाहेब मंडलिकांचें हें चरित्र वाचून रावसाहेबांच्या अंगीं केवळ गुणच होते, त्यांत दोषांची छटाहि नव्हती असा वाचकांचा ग्रह होईल. पण केवळ सद्गुणमय मनुष्य असणें शक्य नाहीं. थोर पुरुषांचें चरित्र त्याच्या गुणांचें अनुकरण व्हावें या उद्देशानें लिहावयाचें ही गोष्ट खरी असली, तरी त्यांचे कांहीं दोष टाळण्यासहि सामान्य माणसास शिकावयाचें असतें. या दृष्टीनें पहातां ज्याला सामान्यतः आपण गुण म्हणतों, त्याचा अतिरेक झाल्यास त्याला दोषत्व येतें हें लक्षांत ठेवून तसा अतिरेक टाळणें अवश्य असतें. रावसाहेब मंडलिकांचा

करारीपणा व न्यायनिष्ठा या दोन गुणांमुळें त्यांची कीर्ति झाली ही गोष्ट प्रसिद्धच आहे. पण हे गुण अतिरेकाला जाऊन कित्येक प्रसंगीं त्यांना अत्याचाराचें स्वरूप आल्याचा लोकापवाद प्रसिद्ध आहे. त्यांच्या मातुःश्री एकदां पंक्तींत त्यांस वाढीत असतां गरसाहेबांनी [illegible] त्यांच्या हातून घांसभर भात अधिक पानांत पडला, त्यावेळीं आपल्या करारीपणास अनुसरून रावसाहेबांनीं तेवढा घासभर भात मातुःश्रीच्या परातेंत परत टाकला व तेव्हांपासून मायलेकांचें दर्शन झालें नाहीं असें सांगतात. ही गोष्ट त्यांच्या मोठेपणास गालबोट लावणारी असली तरी मोठ्यांच्या हातूनहि प्रसंगीं अत्याचार होतात, यास्तव ते टाळण्याचा शक्य तो प्रयत्न केला पाहिजे हाच बोध तिच्यापासून घ्यावयाचा आहे. दुसऱ्या एका प्रसंगीं लग्नाच्या प्रयोजनांत एका लहान मुलानें आपल्या बसण्याच्या जागीं ओल आहे असें पाहून केळीच्या पानांच्या राशींतून एक पान घेतलें व तें खालीं घालून त्यावर तो बसूं लागला. रावसाहेब मंडलिकांच्या हें दृष्टीस पडतांच त्यांच्या न्यायनिष्ठेस अनसरून त्यांनीं त्या मुलास हाक मारून पान कोणाला विचारिल्याशिवाय कसें घेतलें असें विचारिलें. रावसाहेबांची मुद्रा कठोर असल्यामुळें जरा ठांसून त्यांनीं हा प्रश्न विचारतांच मुलगा गर्भगळित झाला व रडूं लागला. हरहर महादेव होऊन मंडळी जेवावयास लागली. पण रावसाहेब व मुलगा यांचा मुग्ध संवाद चालला असून मुलगा तसाच उभा आहे असा देखावा दिसत होता. मुलगा बराच वेळ उभा होता हें पाहून मंडळींनीं मध्यें पडून मुलाची सुटका केली व मग तो जेऊं लागला. ही गोष्ट क्षुल्लक खरी, पण अत्याचारी यांत शंका नाहीं. आणि असे अत्याचार थोरांच्या हातूनहि घडतात, यास्तव ते टाळण्याचें काम किती अवश्य आहे हें समजून येतें. असल्या गोष्टी या चरित्रग्रंथांत आलेल्या नाहींत हें ठीकच आहे.

बुद्धिमत्ता, देशहिततत्परता, उद्योगशीलता, इत्यादि गुण हे सर्वदा वंदनीयच आहेत. पण करारीपणा, व वक्तशीरपणा इत्यादि गुणांना विशेष मर्यादेंतच सद्गुणत्व असतें. मर्यादा अतिक्रांत झाल्यास त्या गुणांना दोषत्व येतें. रावसाहेबांनीं वक्तशीरपणाचें व्रत उचलून कीर्ति मिळविली व त्या कीर्तीच्या जोरावर पुष्कळ जनकार्यहि केलें. या वक्तशीरपणाच्या पायीं त्यांच्या धंद्यांत कित्येक वेळां नुकसानहि सोसावें लागलें. कामासंबंधीं मत घेण्यासाठीं अमुक वेळीं या असें त्यांनीं पक्षकारास सांगितलें असतां तो पक्षकार ठरीव वेळीं गेला नाहीं तर रावसाहेबांनीं त्याला भेटावयाचें नाकारून घरीं चालत आलेल्या पैशावर उदक सोडल्याच्याहि गोष्टी प्रसिद्ध आहेत. पण हा वक्तशीरपणा ऐश्वर्यवंताचें भूषण असला तरी लोकांमध्यें मिसळून त्यांची सुधारणा करूं पहाणाऱ्या पुढाऱ्याला त्यांची योजना पाहूनच करावी लागेल. स्वतः गरजवंत अशा माणसालाहि हाच नियम लागू आहे. लोकमान्य टिळकांसारख्या पुढाऱ्यांत अशा प्रकारचा करारीपणा दोषच ठरला असता. लोक ठरीव वेळीं सभेला आले नाहींत तर सभाच बंद करून चालूं लागावयाचें हा करारीपणा खरा, पण तो अतिरिक्त होईल, व त्याचा अवलंब केल्यानें पुष्कळ प्रसंगीं कार्यहानि केल्याचाच दोष पुढाऱ्याच्या माथीं येईल, हें विसरून चालावयाचें नाहीं.

असो. प्रस्तुत चरित्रग्रंथ रावसाहेबांचा जीवनक्रम समजून घेण्याच्या दृष्टीनें उपयुक्त आहे. त्यांतील सामग्रीचा उपयोग करून रा. आठल्यांसारख्या कुशल लेखकाला उत्तम चरित्र लिहितां येईल यांत शंका नाहीं. रावसाहेब मंडलिकांचें कर्तृत्व बहुविध असल्यामुळें, न्या. रानडे, लोकहितवादी रा. ब. देशमुख, दादाभाई नौरोजी, नाना शंकरशेट, गोखले, मेथा, वाच्छा, टिळक, अशा कर्तृत्वशाली पुरुषांशीं सद्भावयुक्त तुलना करणेंहि उपयुक्त झालें असतें. त्यांच्या वेळची परिस्थिति त्यांच्या मोठेपणास कारण होती, किंवा मोठेपणा परिस्थितिनिरपेक्ष होता, राजकारणविषयक त्यांचीं मतें स्वतंत्र होतीं कीं परिस्थितीनें निर्माण केलीं होतीं, इत्यादि प्रश्नहि मंडलिकांच्या चरित्राचा विचार करितांना महत्वाचे असून त्यांचीहि चर्चा

चरित्रांत झाली पाहिजे होती. पण आहे या स्थितींतहि मंडलिकांसंबंधाची बरीच सविस्तर हकीकत ह्या चरित्रग्रंथावरून मिळण्यासारखी आहे.

या परीक्षणाच्या लेखकाचें ग्रंथकारांशीं शिष्यत्वाचें नातें असल्यामुळें त्यानें जरा मोकळे-पणानें पण नम्रपणें ही गुरुसेवा केली आहे, व ती गुरुवर्यांना मान्य होईल अशी त्याला वळकट आशा आहे.

---

# अभिप्राय

**श्रीरामगीता**– (लेखकः-- मुकुंद वामन बर्वे) या पुस्तकांत रामगीता मूळ दिली जसून तिचें हिंदी व इंग्लिश भाषांतर देऊन ग्रंथाची उपयुक्तता वाढविली आहे. शिवाय वामन पंडिताचें पद्यात्मक भाषांतरहि आहेच. यामुळें पुस्तक संग्राह्य झालें आहे. श्री. बर्वे हे इंदूरचे असल्यामुळें महाराष्ट्रापेक्षां इतरत्र त्यांची दृष्टि असणें स्वाभाविक आहे. पुस्तकाची प्रस्तावना वर्तमानपत्रांतील विषय होण्यासारखी आहे. किं. रु. २॥

**महाराष्ट्राची इभ्रत**– (पृष्ठें १२८; किंमत ८ आणे) सांगलीचे रा. रामचंद्र अनंत लागू यांनीं पटवर्धन घराण्याच्या उदयासंबंधानें हें कथानक लिहिलें असून लोकमित्रकर्ते रा. सडेकर यांनीं तें प्रकाशित केलें आहे. इतिहासामध्यें अवश्य तेवढेंच तिखटमीठ घालून त्यांतील प्रसंगाची रुचकर गोष्ट करण्याची पद्धति रा. लागू यांनीं या लेखनांत स्वीकारिली असल्यामुळें या गोष्टीच्या वाचनानें करमणुकीबरोबर इतिहास-ज्ञानहि सहजींच होण्यासारखें आहे. हें कथानक लहानशा दोन भागांत रचिलें असून पहिल्यांत पटवर्धन घराण्याचा पेशव्यांकडे प्रवेश कसा झाला व रामचंद्रराव पटवर्धन यांचा बाजीरावानें अपमान केल्यामुळें रामचंद्रपंताना राग आला असतां मुत्सद्दीपणाच्या दृष्टीनें सच्चिदानंद स्वामींनीं दोघांमध्यें समेट घडवून आणिला असा वृत्तांत आला आहे. दुसऱ्या भागांत उत्तर हिंदुस्थानांतील बाजीरावाच्या मोहिमेचें वर्णन असून त्यांत रामचंद्रपंतांनीं किरातसिंगानें दिलेल्या आव्हानाचा स्वीकार केला व त्यांशीं द्वंद्वयुद्ध करून महाराष्ट्रवीरांचें नांव उत्तरहिंदुस्तानांत गाजविलें इत्यादि वृत्त दिलें आहे. हा सर्व वृत्तांत ऐतिहासिक असून हरिवंशाच्या बखरींतून अवश्य तो उताराहि रा. लागू यांनीं जोडिला आहे. कथानक स्फूर्तिदायक व चटकदार झालें जसून त्याची भाषा व वर्णनें सहज व प्रसंगानुरूप आहेत.

**व्यापारी**-- (पृष्ठें १५६ किंमत १ रुपया) महाराष्ट्र–कुटुंबमालेचें हें बारावें पुष्प असून रा. गणेश काशिनाथ गोखले यांनीं लिहिलें आहे. या गोष्टींत विनायकराव

नांवाच्या गृहस्थानें लहानपणीं हूड असतांहि व्यापारांत लक्ष घातल्यामुळें व त्यांतच निश्चयानें टिकून राहिल्यामुळें आपली भरभराट कशी करून घेतली हें त्याच्या मुखानें मोठ्या चटकदार रीतीनें वदविलें आहे. गोष्ट तर खरीच, पण अलीकडील काळाला ती अत्यंत अनुरूप असून सत्याला अगदीं धरून आहे. यांतील व्यापारी विनायक व सरकारी नोकरी करीत असलेला त्याचा कवि मित्र अशा जोड्या आज महाराष्ट्रांत कांहीं पहावयास मिळण्यासारख्याहि आहेत. आपले लेख चटकदार करण्याची यांत स्वीकारलेली पद्धति चित्ताकर्षक असून मुलांना ही गोष्ट मोठी उत्साहवर्धक होईल.

उपरोक्त मोठीं पुस्तकें कोणत्याहि बाल-वाचनालयांत अवश्य असावीं.

**अनाथ माधव** (प्रकाशक— महाराष्ट्र पब्लिशिंग हाउस लिमिटेड— पुणें.) प्रख्यात आंग्ल कादंबरीकार चार्लस् डिकन्स् ह्याच्या 'ऑलिव्हर ट्विस्ट' नामक कादंबरीचें मराठी भाषेंतील रूपांतर होय. रूपांतराच्या पद्धतीबद्दल जरी अद्यापि एकमत नसलें तरी वाङ्मयवृद्धीच्या, व ज्ञानवृद्धीच्या दृष्टीनें अशा तऱ्हेच्या रूपांतरांची अत्यंत आवश्यकता आहे; ह्या दृष्टीनें पाहूं गेल्यास, रूपांतर चांगलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. मूळ कादंबरी सर्वांच्या परिचयाची असल्यामुळें आंतील मजकुराबद्दल विशेष लिहिण्यास नको. रूपांतरामुळें जरी कांहीं ठिकाणीं भाषेमध्यें व कथानकामध्यें कृत्रिमपणा व परकीपणा दिसून येतो तरी एकंदरीनें पुस्तक फारच काळजीपूर्वक लिहिलेलें आहे. मूळ ग्रंथ आंग्लभाषेंतील असल्याकारणानें कांहीं ठिकाणीं वाक्यरचना व भाषापद्धति आंग्ल पद्धतीवर जावी हें साहजिकच आहे.

मराठी भाषेंतील बालवाङ्मयाची उणीव भरून काढण्यासाठीं हें पुस्तक महाराष्ट्र पब्लिशिंग हौसनें प्रसिद्ध केलें आहे, असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. ह्या दृष्टीनें पाहिल्यास मूळ पुस्तकाची निवड चांगली झाली आहे असें म्हणतां येणार नाहीं. पुस्तकांतील प्रसंगसुद्धां लहान मुलांच्या दृष्टीनें विशेष उपयुक्त आहेत असें वाटत नाहीं. ह्यासाठीं प्रकाशकांचा हेतु विशेष सिद्धीस जाईल असें दिसत नाहीं.

ग. स. जोग

**सुभाषित मराठी भाग १ ला.** (ले. नारायण नरसिंह फडणीस, संपादक काव्यरत्नावली. किं. १ रुपया.) सुभाषित मराठी हें नांव देण्याऐवजी मराठी सुभाषित हें नांव कां दिलें नाहीं हें समजत नाहीं. संस्कृत सुभाषिताचें हें मराठी भाषांतर होय. भाषांतरांत प्रतिभेचा अर्थात् प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. पण हें सुभाषित मराठींत इतकें उत्कृष्ट वठलें आहे कीं, संस्कृत सुभाषित वाचून जो आनंद होतो तितकाच आनंद हें मराठी सुभाषित वाचूनहि होतो. यापेक्षां रा. फडणीस यांच्या या रम्य कृतीची प्रशंसा दुसऱ्या कोणत्या शब्दानें करितां येण्यासारखी आहे ! रा. फडणीस यांनीं मराठी भाषेला अर्पण केलेला हा ग्रंथ अप्रतिम अलंकार आहे. परिचयकार, प्रस्तावनाकार वगैरे विद्वानांनीं या ग्रंथाची केलेली वाखाणणी आम्हांला सर्वथैव मान्य आहे.

**नवीन श्री समर्थविद्यालयाचा दशम वार्षिक वृत्तांत.** जमल्यास राष्ट्रीय शिक्षणावर स्वतंत्र लेख लिहिण्याचा मानस असल्यामुळें सध्यां या वृत्तांतासंबंधानें आम्ही कांहीं लिहीत नाहीं.

गोविंदाग्रज आणि अविमारक या पुस्तकांवर अभिप्राय यथावकाश देण्यांत येईल.

**उत्तरा आणि अभिमन्यु**—बालबोध-पुराण-मालेपैकीं. कल्पना स्तुत्य. मुलांनीं अवश्य वाचावें. किं. २ आणे. प्रकाशक पी. व्ही. गोळवलकर, बुकसेलर, सांगली.

**सुकुमारचरित्र**— सखाराम नेमचंद जैनग्रंथ माला—(प्रकाशक रावजी सखाराम दोशी सोलापूर किं. १ रु.) श्रीसुकुमार हे जैनमुनी होते. त्यांचें चरित्र संस्कृतांत श्रीसकलकीर्ति आचार्यांनीं कवितावद्ध लिहिलें. त्याचें मराठी भाषांतर जिनदास पार्श्वनाथ यांनीं केलें. जैन व हिंदु हा भेद नाहींसा करण्यास अशा ग्रंथांची उपयुक्तता फार आहे.

**आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष**— (ले. महादेवशास्त्री दिवेकर.) अभिप्राय सवडीप्रमाणें पुढें. किं १ रु.

**तेरावें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन, ग्वालेर.** प्रकाशक चंद्रोजीराव संभाजीराव आंग्रे. किं. २ रु.

**भगवान् श्रीकृष्ण**— (ले. स. रा. देशपांडे हेडमास्तर मराठी शाळा त्र्यंबकेश्वर किं. १२ आणे.) शठं प्रति शाठ्यं हें तत्त्व विशद होईल अशा रीतीनें लिहिलेलें कृष्णचरित्र. भाषा सुलभ. मुलांनीं वाचण्यालायक. केसरीचे सहसंपादक केतकर यांची प्रस्तावना. लोकमित्र मासिकाच्या वर्गणीदारांस बक्षिसादाखल देण्यांत रा. सडेकर यांचा उत्साह व वर्गणीदारांविषयीं कळकळ दिसून येते.

**काव्यकथा**— (प्रकाशक भारत—कविमंडळ कोल्हापूर किं. १० आणे.) बोधप्रद कथा. निवड योग्य.

**गंगाजळी**— कवि वामन विष्णु वैद्य यांच्या कविता किं. ४ आणे. कविता हृदयस्पर्शी आणि सोज्वळ.

**वैदिक कर्मयोग**— (मासिक— गीताधर्ममंडळ. वार्षिक वर्गणी ३—३ रु.) गीतावाचस्पती सदाशिवशास्त्री भिडे यांच्या संपादकत्वाखालीं मासिकांतून उपनिषत्-प्रकाशन होणार आहे. गीता कर्मपर आहे असें टिळकांनीं ठरविलें. आतां सर्व उपनिषदेंहि कर्मयोगाचाच उपदेश करणारीं आहेत हें सिद्ध करण्याचा हेतु समोर ठेवून उपनिषदांचा अर्थ करण्यांत येणार आहे. शंकराचार्यांच्या वकिलीला ही आधुनिक ज्ञान्यांची वकिली मागें टाकते कीं काय हें अर्थात् पुढेंच कळणारें आहे. प्रस्तावनेंत शास्त्रीबोवा लिहितात कर्म, उपासना व ज्ञान या तीन तत्त्वांपैकीं एक जरी

कमी पडलें तरी मानवी जीवितास कृतार्थता येणार नाहीं असा ठाम वैदिकसिद्धांत आहे. उपनिषदांनीं या तीनहि तत्त्वांची आवश्यकता सारखीच प्रतिपादन केली आहे. पण ज्ञान शब्दानें ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या असें समजावयाचें नाहीं. परा व अपरा या दोनहि विद्यांचें ज्ञान हेंच येथें ज्ञान समजावयाचें असें दिसतें.

**निशिगंध**– (प्रकाशक रामकृष्ण गणेश हर्षे- कवि ? किंमत ४ आणे) हें एक आनंदपर्यवसायी नसलेलें लहानसें काव्य आहे. पद्यांत आधींच सहज मनोहरता. त्यांत पद्याचा विषय 'स्त्री' असला म्हणजे दुधांत साखर पडल्यासारखें होतें. अशा या मिश्रणांत कल्पनामनोहरत्वाची मिसळ असली म्हणजे त्याचा स्वाद आनंददायीच होणार. पुरुषपुरुषांच्या प्रेमाप्रमाणें स्त्रीपुरुषांचें निरपेक्ष प्रेम असूं शकेल काय वगैरे सारखे तात्त्विक प्रश्न कवीला सुचले आहेत. "प्रेमाचा नाहीं जगतीं लग्नाशीं संबंध." अर्पणपत्रिकेंतीलहि कल्पना चांगली आहे. आपलें असेल तें आपण दुसऱ्यास अर्पण करूं. पण जिच्यापासून काव्यस्फूर्ति प्राप्त झाली तिला अर्पण काय करणार ? काव्याचा सांगाडा ?

**कादंबरीकथा**–(ले. नीलकंठ शंकर नवरे, बी. ए. बी. टी., शिक्षक, नॉर्थकोट हायस्कूल, सोलापूर. किं. ८ आणे.) हें ८८ पृष्ठांचें उत्तम छपाईचें पुस्तक ८ आण्यांना माफकच म्हटलें पाहिजे. श्री नवरे यांनीं नवीन पण अत्यंत उपयुक्त असें कार्य अंगावर घेतलें आहे. संस्कृत नाटक-कादंबऱ्यांना ते मराठीचा वेष देत आहेत. संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें हा त्यांचा या दिशेनें पहिला प्रयत्न होय. हा सर्वसंमत होतांच कादंबरीची कथा त्यांनीं आतां मुळांतील समासांचे कांटे वगळून मराठींत मोहक भाषेंत लिहिली आहे. श्री. नवरे यांचा हा प्रयत्नहि चांगलाच सिद्धीस गेला आहे. बाणभट्टाची माहिती, टिप्पणी, सूक्तिसंग्रह इत्यादिकांनीं पुस्तकाची उपयुक्तता द्विगुणित झाली आहे.

श्री. नवरे यांचें उदाहरण विद्याखात्यांतील इतर शिक्षकांना अनुकरणीय नाहीं काय?

**'पोपटपंची'** (कवीः–जयकृष्ण केशव पाध्ये प्रकाशकः–महाराष्ट्र पब्लिशिंग हाउस लि. पुणें) या लहानशा काव्यसंग्रहांत प्रतिभेचा प्रकाश जरि विशेष नसला तरी रचना प्रसादपूर्ण सहज सुलभ अशी आहे. कांहीं कवितांतून कवीचा श्रद्धाळु प्रेमळ-पणा चांगला प्रत्ययास येतो. गीतराघवांतील गीतें सरस वठलीं आहेत. विनोदी कविता संग्रहांतून वेगळ्या असत्या तर बरें झालें असतें. एकंदरींत संग्रह पोपटपंची-प्रमाणें मनरंजनीय आहे.

कृ. रा. परांजपे.

---

पोंच

**मराठी ग्रंथांची वयाजवार यादी** (तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथसंग्रहांतील) भाग १ ला किंमत एक रुपया.

**डे. व्ह. ट्र. सोसायटीचा १९२८–२९ सालचा रिपोर्ट.**

**तेरावें महाराष्ट्र साहित्यसंमेलन १९२८**

**त्रैमासिक भा. इ. सं. मंडळ**– पौष-फाल्गून १८५०

**काव्यरत्नावली**–वर्ष ३६ अंक ८— रा. खापर्डे यांची "पृथ्वीराज व महमद घोरी यांचा संवाद" ही पहिलीच कविता वाचनीय आहे.

**सहविचार**– जून १९२९

**भारतकुमार**– मे-जून १९२९ संपादक गो. ग. भोसेकर. बालवीरांना उपयुक्त.

---

# मराठी साहित्यसेवकांस दोन सूचना.

( लेखकः—वा० रा० गुर्त्तीकर रि. फ. क्ला. सबजज्ज. )

प्रेमाच्या किंवा कुतूहलाच्या दृष्टीनें पाहिलें तरी आपल्या इकडे अरबी वाङ्मय व इतिहास यांचा व्यासंग मुळींच नाहीं म्हटल्यास हरकत नाहीं. मुसलमानांचा व आपला आज चांगला वाराशें वर्षांचा सहवास आहे. त्यांच्या अरबस्तानांतील खलिपांनीं व हिंदुस्थानांत अकबर व दाराशुकोसारख्या विद्याभिलाषी राजपुरुषांनीं आपल्या भारतीय संस्कृतीचा अभ्यास जितक्या आस्थेनें केलेला आपण पाहतों, त्याच्या अगदीं लहान हिश्शानें सुद्धां आपण त्यांच्या संस्कृतीचा अभ्यास केला नाहीं ही गोष्ट नाकबूल करितां यावयाची नाहीं. ज्ञानानें प्रेम वाढतें व अज्ञानानें भीति व संशय हे वाढतात हें आपण पाहातों. पण आपल्या इतके दिवसांच्या शेजाऱ्यांबद्दल आपण आपलें कर्तव्य आजवर केलें नाहीं अशी स्थिति आहे.

मुसलमान हिंदुस्थानांत येण्याच्या अगोदरचा अरबांचा इतिहास केवळ ऐतिहासिक दृष्टीनेंसुद्धां फारच मनोरंजकच नव्हे तर बोधप्रद आहे.

महम्मद पैगंबराचा काळ म्हणजे सातव्या खिस्ती शतकाचा मध्य व मध्योत्तर काल हें सर्वांस ठाऊक आहे. आपल्याकडे व्यवहारांत फसली साल आहे, व इतिहासज्ञ अरबी, हिजरी सन जाणतात. त्या कालाच्या अगोदरपासून चांगली १५०० किंवा १७०० वर्षें अरब खलाशी व व्यापारी दर्यामार्गें एकीकडे रोम व इजिप्त तर दुसरीकडे चीन, मलाया, हिंदुस्थान इतक्या प्रदेशांत व्यापारासाठीं जा ये करीत असत. त्यांनींच भारतवर्षांतील विद्या—गणीत, बीजगणीत, रसायन ( Chemistry अरबी किमया अल्किमिया ) वैद्यक इ० इकडून नेऊन त्यांचा ग्रीक लोकांत प्रसार केला व ग्रीकांनीं त्यांचा युरोपांत प्रसार केला. त्याचप्रमाणें भारतवर्षांतील सुप्रसिद्ध पंचतंत्र व हितोपदेश यांतील उद्बोधक गोष्टी त्यांच्याच द्वारें युरोपांत गेल्या. त्यांचें एकरूप Fables of Pilpay Bidhapai व दुसरें इसापच्या नीतिकथा झालें. पर्शिअनमधील अन्वारी सुहाइली म्हणजे वरील कथांचाच अरबी अनुवाद आहे. त्यांतील कलिला-व-दिम्नामध्यें करटक व दमनक अरबी नामरूप पावलेले दिसतात. मसाउदी वगैरे इतिहासकारांच्या लेखांवरून आरबी खलाशी, जपान चीनपर्यंत सफरी करीत व त्यांचे चोळ, पाण्ड्य व केरळ देशांशीं व्यापाराचे निकटसंबंध असत असें दिसतें. युरोपियन खलाशी आफ्रिकेच्या पूर्वेकडील समुद्रांत येईपर्यंत दर्यावरदी अरबांना कोणीहि शत्रु नव्हता म्हणावयास हरकत नाहीं. म्हणजे काय तर आरबांचा व आपला संबंध जवळ जवळ दोन हजार वर्षांचा आहे.

बुद्धाच्या अनेक जातक कथांपैकीं बावेरु जातक म्हणून ज्याला म्हणतात त्यांत भारतवर्ष व बावेरु म्हणजे बाबिलोन यांच्यामध्यें समुद्रमार्गें दळणवळण होतें असें वर्णन आहे. आपल्या इकडील मोर, पोपट, माकड, कुत्रें इ० प्राण्यांची तिकडे फार चहा असे. असें वर्णन पाहून असें वाटतें कीं फार फार प्राचीन काळापासून भारत वर्ष व बाबिलोन, मिसर, ग्रीस व रोम यांच्यामध्यें दर्यामार्गें पुष्कळ दळणवळण चालत असे. या देवघेवींत आरब अगदीं मध्यवर्ती दर्याकिनारी राहात असल्यानें त्यांनीं विशेष भाग घेणें क्रमप्राप्तच होतें व त्यांनीं इकडील विद्या व अजब पदार्थ तिकडे नेले हेंहि ठीकच झालें. आरबांनीं इकडून काय काय नेलें व तिकडील काय काय इकडे आणिलें याचा अभ्यास, इतिहास, वैद्यक, रसायन, वाङ्मय व तत्त्वज्ञान यांच्या दृष्टीनें होणें जरूर आहे.

तसेंच महमद पैगंबराच्या काळीं अरबस्तानांत कोणता धर्म, कोणतें तत्त्वज्ञान प्रचलित होतें व पैगंबराचें वैशेष्य कशांत आहे याचा अभ्यास होणें जरुरीचें आहे. जीवात्मा, पैगंबर व परमात्मा यांचे परस्परसंबंध पूर्वी कसे समजले जात व पैगंबरानें ते कसे आहेत याचा उपदेश केला, पैगंबराच्या शिकवणींत जुनें कितपत घेतलें आहे नवीन काय आहे, हें जाणणें जरूर आहे.

जीवात्मा निराळा, पैगंबर निराळा, व परमात्मा व अल्ला हा एकच "असम" (ज्याला सम म्हणजे बरोबरीचा कोणी नाहीं) किंवा एकमेवाद्वितीय सर्वोत्तम (नास्ति तत्समो देवो न भूतो न भविष्यति) असें निर्भेळ एकेश्वरी मत प्रतिपादन करणारा मुसलमानी धर्म केवळ पैगंबरापासूनच उगम पावला किंवा त्यांतील कांहीं तत्त्वें इतर पंथांतून घेतलीं आहेत याची ऐतिहासिक व तौलनिक दृष्ट्या छाननी झाली पाहिजे. त्याचप्रमाणें कोऽहम् सोऽहम् इ० तात्त्विक व सनातन प्रश्नांना मुसलमानी धर्म काय उत्तर देतो ? मोक्ष, स्वर्ग, नरक व धर्मसंस्थापकांचे "विनाशाय च दुष्कृताम्" व "परित्राणाय साधूनाम्" व "धर्मसंस्थापनार्थाय" इ० कार्यासाठीं झालेलें व होणारे अवतार यासंबंधीं मुसलमानी धर्माचें म्हणणें काय आहे हें आपण समजून घेणें जरूर आहे. मनुष्याला जोराजुलमानें धर्म स्वीकारावयास लावणें हें खरोखरच पुण्य-कारक आहे काय ? असें साहजीकच मनांत येतें व अशी पैगंबराची शिकवण नसेल असें वाटतें. तेव्हां खरोखरच पैगंबराची शिकवण अशी आहे कीं काय ? इ० गोष्टी समजणें फार जरूरीचें आहे. कारण जर मुसलमानी धर्मांतील गोष्टींपैकीं कांहीं गोष्टी हिंदुधर्मांतील गोष्टींशीं तद्भव किंवा तत्सम असतील तर त्या मानानें त्यांचा व हिंदुधर्माचा विरोध कमी होईल व त्यायोगें सलोखा वाढण्यास मदत होईल.

मक्केला एक विष्णुपद आहे अशी आपल्या इकडे समजूत आहे. तिचा अर्थ असा दिसतो कीं तेथें फार प्राचीन काळीं आर्य धर्म व आर्य संस्कृतीचें एक केंद्र असावें. असें असल्यास मुसलमानांप्रमाणेंच आम्हांला तें स्थान पवित्र होईल.

त्याचप्रमाणें पश्चिम व मध्य एशियांतील हल्लीं मुसलमानी धर्मानें चालणारे समाज पूर्वी कोणत्या धर्माचे होते व ते ते धर्म सोडून त्यांनीं मुसलमानी धर्माचा स्वीकार कां केला हेंहि आपणांस समजणें जरूर आहे. एकमेकांची एकमेकांना माहिती झाली म्हणजेच एकमेकांबद्दल प्रेम, आदर इ० भाव उत्पन्न होतात. वराहमिहिर आपल्या बृहत्संहितेंत म्हणतो:—

"म्लेंच्छा हि यवनास्तेषु सम्यक्शास्त्रमिदं स्थितम् ॥
इदं शास्त्रम् नाम ज्योतिषशास्त्रम् ॥

व यामुळें

ऋषिवत् तेऽपि पूज्यन्ते किं पुनर्दैवविद्द्विजाः ॥

यांतील ऋषिवत् शब्द फार महत्त्वाचा आहे. त्यावरून विद्यावन्तांबद्दल वराहाचा आदर उत्कृष्ट रीतीनें प्रगट होतो.

२ री सूचना चिनी वाङ्मयाच्या अभ्यासाविषयीं आहे.

या बाबतींतहि युरोपियन पंडितांनीं फारच स्तुत्य परिश्रम केले आहेत. हें आपल्या वाचकांस सांगणें नको. पण आतां आपण प्रत्यक्ष चिनी भाषा, वाङ्मय व इतिहास यांचें अध्ययन करावयास हवें.

वैदिक आर्य ज्यावेळीं सप्तसिंधूंत आपली संस्कृति निर्माण करीत होते, त्यावेळीं चीन देशांत काय स्थिति होती? कोण लोक होते, कसे राहात होते, कोणता धर्म किंवा विधि मानीत असत? त्यांचा व हिंदुस्थानचा संबंध प्रथम कोणत्या काळांत सुरू झाला? व तो काय खुषकीनें प्रथम सुरू झाला, किंवा समुद्रमार्गानें सुरू झाला? अगस्ति ऋषि काय काम्बोडियापर्यंतच गेले? किंवा पलीकडे चीन जपानलाहि जाऊन अमेरिकेला सुद्धां गेले; व पेरू व मेक्सिको देशांच्या संस्कृतीचे आद्यप्रवर्तक झाले? या व अशासारख्या प्रश्नांना आमच्या पंडितांचें उत्तर हवें. वादेवादे खरें काय तें ठरेल पण अगोदर या मार्गानें परिश्रम व्हावयास पाहिजे.

वेदांतील सिनीवाली ("सिनीवाली चंद्रयुक्ता" असा कोश आहे.) हा शब्द आरबींतील सिन=चंद्र व वाली—युक्ता दोन शब्दांनीं साधलेला उघड दिसतो. व चिनी भाषेंतील इन्तु=चंद्र आपल्या 'इन्दु'च्या अगदीं जवळ येतो. यावरून कदाचित् आमच्या आर्य पूर्वजांचा अम्मल इकडे अरब (अरब?) व तिकडे चीन-पर्यंत चालत होता असें सिद्ध होईल. व हे एकाच वंशाचे तीन प्रदेश, एकमेकांचे बंधु आहेत असेंहि सिद्ध होईल.

सेन्ट जार्ज व त्याचा ड्रेगन; चिनांतील ड्रेगन, व वृत्राहि व इंद्र ह्या कथा मननीय आहेत त्याबद्दल पुढें एखादे वेळीं लिहीन.

---



# अभिनंदन

कल्पद्रुमो न जानाति न ददाति बृहस्पतिः
अयं तु तुकजीरावो जानाति च ददाति च ॥ सुभाषित.

देवासचे (मोठी पाती) अधिपति श्रीमंत सरकार तुकोजीराव महाराज पवार यांनीं वर्षांत प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांत जो परीक्षकांच्या बहुमतानें सर्वोत्कृष्ट ग्रंथ ठरेल त्यांस २०० रुपयांचें प्राइझ ठेवून वरील सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें आपली गुणज्ञता व दातृत्व हे गुण एकसमयावच्छेदेंकरून प्रकट केले आहेत. सर्व हिंदुस्तानांत विद्येचें एकमेवाद्वितीयं म्हणून गाजलेल्या नगरांत आज हजार वर्षांनंतर भोजराजाची स्मृति जागृत झालेली पाहून कोणालाहि आनंदच होईल. ही प्राइझ योजना अत्यंत समर्पक आहे. तसेंच ती शक्य तितकी निर्दोष आहे असें आम्हांस वाटतें. या योजनेचा दुरुपयोग प्रथम कांहीं वर्षें होईल याविषयीं आम्हांला शंका नाहीं. पण याचें खापर सर्वस्वीं परीक्षकांच्याच माथ्यावर फुटणार हें उघड आहे. परीक्षकांचीच ही परीक्षा आहे. त्यांनीं आपली जबाबदारी ओळखून काम केल्यास सर तुकोजीराव महाराजांची इच्छा सफल झाल्यावांचून राहणार नाहीं. म्हणून देवास महाराजांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. प्राइझ शब्दाबद्दल वाईट वाटतें. पण उपयोग काय ? प्राइझ शब्दाला समर्पक असा मराठी शब्द कोणी सुचवीत नाहीं तोंपर्यंत दात्याचा विनय व निस्पृहता यांचा सूचक असा जो हा परकी शब्द त्याला तूर्त कवटाळल्याशिवाय गत्यंतर दिसत नाहीं. प्राइझ शब्दाला मराठी शब्द सुचविणाराला प्रथम बक्षीस ठेवण्याची पाळी आली आहे.

स. १९२८ सालचा परीक्षेचा निकाल पुढें दिला आहे त्यावरून परीक्षकांनीं श्री. के. स केळकर यांचें "श्रीतुकाराम महाराज" हें पुस्तक प्राइझ देण्यालायक ठरविलें असें दिसतें. प्राइझकरतां सुचविलेल्या पुस्तकांच्या यादींत मुलींची द्रौपदी, श्री. विडकर महाराज यासारखींहि पुस्तकें आहेत. पहिलेंच वर्ष असल्यामुळें कदाचित् परीक्षक बेसावध असतील. आमची अशी सूचना आहे कीं परीक्षकांनीं दिलेल्या गुणांबरोबर परीक्षकांचीं नांवेंहि प्रसिद्ध करण्यांत यावीं, म्हणजे बेजबाबदारीचा अंश कमी होईल.

# भोजराज प्राइझ

देवास (सीनियर) संस्थानाधिपति श्रीमंत सर तुकोजीराव महाराज पवार के. सी. एस. आय. यांनीं वर्षांतील सर्वोत्तम ग्रंथांस भोजराज प्राइझ या नांवाचें दरवर्षीं दोनशें रुपयांचें बक्षीस ज्ञानप्रसारक मंडळ देवास (सीनियर) मार्फत देण्याचें दयाळुपणानें अभिवचन दिलें होतें त्याप्रमाणें योजना वर्तमानपत्रांत जाहीरहि करण्यांत आली. त्या योजनेस अनुसरून महाराष्ट्रांतील निरनिराळ्या विद्वानांस अभिप्राय पाठविण्यांविषयीं जाहीर विनंती करण्यांत आली. एकंदर २९ परिक्षकांकडून निरनिराळ्या ४१ ग्रंथांवर अभिप्राय आले. त्यांचा निकाल होऊन सन १९२८ सालांतील सर्वोत्तम ग्रंथ म्हणून श्रीयुत केशवराव सदाशिव केळकर, इंदूर यांच्या श्रीतुकाराम महाराज या ग्रंथास, सर्वांपेक्षां जास्त गुण मिळाले असल्यानें त्यांस वरील बक्षीस देण्याचें ठरविण्यांत आलें आहे.

डी. वी. शिंदे. B. A.
चिटणीस.

सी. डब्ल्यू. पंडित. M. A. M. Sc. L. L. B.
अध्यक्ष.

## निकालाचा तपशील

| ग्रंथ | ग्रंथकार | गुण | शेरा |
|---|---|---|---|
| श्री तुकाराम महाराज | के. स. केळकर | ६४ | पांच परीक्षकांनीं प्रत्येकीं ५, सातांनीं ४, तिघांनीं ३, एकानें २, असे मार्क दिले. |
| नवयुगधर्म | स. कृ. फडके | ४४ | पांचांनीं ५, दोघांनीं ४, तिघांनीं ३, दोघांनीं १. |
| सुधारक | प्रो. मा. त्रिं. पटवर्धन | ३३ | दोघांनीं ५, तिघांनीं ४, तिघांनीं ३, व एकानें २. |
| लो. टिळकांचें चरित्र | न. चिं. केळकर | ३० | तिघांनीं ५, तिघांनीं ४, एकानें ३, |
| एतिहासिक पोवाडे | य. न. केळकर | २६ | चौघांनीं ४, दोघांनीं ३, व दोघांनीं २. |
| सन १८५७ सालचें बंड | ना. के. बेहरे | २६ | एकानें ५, तिघांनीं ४, दोघांनीं ३, एकानें २, व एकानें १. |
| भारतीय नाट्यशास्त्र | कु. गोदूबाई केतकर | २५ | |
| साधन चिकित्सा | ना. सि. बेंद्रे | १८ | |

| | | |
|---|---|---|
| मराठ्यांच्या लढायांचा इतिहास | प्रो. शि. म. परांजपे | १४ |
| जादुगार | ना. सि. फडके | १४ |
| अभंग गीतांजली | ऋग्वेदी | १४ |
| आंबराई | गिरीश | १३ |
| विधवा कुमारी | भा. वि. वरेरकर | १२ |
| हिंदी शिल्पशास्त्र | कै. कृ. वि. वझे | ८ |
| श्री बीडकर महाराज | ल. ग. बापट | ८ |
| विलापिका | ग. त्र्यं. माडखोलकर | ८ |
| ऋग्वेदाचें भाषांतर | चित्रावशास्त्री | ७ |
| रहस्यबोध | ना. ब. हर्डीकर | ७ |
| सवती मत्सर | कृ. प्र. खाडिलकर | ५ |
| लो. टिळकांच्या आठवणी | बापट | ४ |
| गृहजीवनशास्त्र | संत व जोगळेकर | ४ |
| हिंदुलग्न-संस्था | निमकर | ३ |
| विचारविलास | वा. म. जोशी | ३ |
| यशोधन | य. दि. पेंढरकर | ३ |
| कथाकुंज | सौ. आनंदीबाई शिर्के | ३ |
| पं. जगन्नाथराय चरित्र | भांबूरकर | ३ |
| रायरासोल्लास | रा. जोशी | ३ |
| मधुसंभार | हुपरीकर | २ |
| विधिलिखित | व. शां. देसाई | २ |
| सचित्र महाराष्ट्र | तोरो | २ |
| मुंबई इलाख्यांतील जाती | कालेलकर | २ |
| कथाकलाप | विद्यार्थी | २ |
| मुसोलिनी व फॅसिस्मो | द. वा. ताह्मणकर | १ |
| गृहविहार | गो. मुजुमदार | १ |
| सिंहासन | वि. रा. चौघुले. | १ |
| मुलींची द्रौपदी | कृ. गो. किनरे | १ |

कौटिलीय अर्थशास्त्र, प्रतापगडचें युद्ध, ब्रह्मचर्य हेंच जीवन, लग्नाचा बाजार व दौलत हीं पुस्तकें १९२८ सालीं प्रसिद्ध झालीं नसल्यानें बक्षीसाच्या दृष्टीनें त्यांवरील अभिप्राय विचारांत घेतले नाहींत.

# विदर्भसाहित्यसंघ-परिषदेचें संमेलन

वरील संमेलन नागपूर येथें गणेशचतुर्थीच्या दिवशीं ना. दादासो खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें. बेळगांवच्या संमेलनाच्या धर्तीवर ठराव पास झाले. त्यापैकीं दोन ठराव महाराष्ट्राला महत्त्वाचे आहेत. कारण एका ठरावानें बेळगांवास नेमलेल्या शुद्धलेखन कमिटीस पाठिंबा मिळाला आहे व दुसऱ्या ठरावानें विदर्भसाहित्यसंघ ही संस्था महाराष्ट्रसाहित्य परिषदेशीं विरोधी नाहीं असें जाहीर केलें आहे. अध्यक्ष ना. दादासो खापर्डे यांचें समग्र भाषण पुढें दिलें आहे.

## अध्यक्ष नामदार दादासाहेब खापर्डे यांच्या
## प्रास्ताविक भाषणाचा सारांश.

आपण मला ह्या विदर्भ-साहित्य-संघाच्या सहाव्या अधिवेशनाचे अध्यक्ष होण्याचा मान दिला त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. आपण निवडणूक केल्यावर नाहीं म्हणणार मी कोण? भावी प्रजासत्ताक पद्धतीचा हा अरुणोदयकाल आहे. म्हणून मी आपल्या आज्ञेस अनुसरून ह्या उच्च पदाचा स्वीकार करितों. वस्तुतः मी ह्या मोठेपणाला अयोग्य आहे असें मला वाटतें. कारण, मीं एकहि पुस्तक मराठींत, इंग्रजींत, किंवा इतर भाषेंत, लिहिलें नाहीं, आणि वर्तमानपत्रांत अथवा मासिकांत फारसे माझे लेख सांपडणार नाहींत. मग, मला आपण हा मान दिला, ह्याची चिंता करूं लागलों, तेव्हां आपल्या प्रेमावांचून दुसरें कारण आढळून येईना. आपलें शहर नागपुर हें फार मोठें. हिंदुस्थानांत सर्वांत जुनें विद्यापीठ काशीचें पुढें पेशवाईंत नाशीक हें दुसरें विद्यापीठ झालें; आणि भोसलेशाहींत ह्या शहरानें तो मान मिळविला. तो असा कीं, श्री० सदाशिवशास्त्री घुले ह्यांनीं काशीस वादविवाद करून अजिंक्यपत्र मिळविलें, आणि तेथील सर्व पंडितांनीं त्यांना, पालखींत बसवून आपण स्वतः खांद्यावर घेऊन सर्व बनारसभर मिरविलें; आणि 'वैय्याकरणकेसरी' ही पदवी देऊन त्यांचें वर्चस्व कबूल केलें; त्या प्रसिद्ध सदाशिवभट घुल्यांना भोंसल्यांनीं सन्मानानें नागपुरास आणिलें, आणि त्यांच्या अनुषंगानें इतर मोठे पंडित येथेंच आणून त्यांना स्वास्थ्य करून दिलें, आणि ह्याप्रमाणें येथील विद्यापीठ झालें. विख्यात सदाशिवभट घुल्यांचे वंशस्थ आपले स्वागताध्यक्ष आहेत. सदाशिवभटजींचे तदनुसार प्रत्यक्ष शिष्य रंगाचार्य आणि कृष्णशास्त्री; व त्यांचें शिष्य कै० महामहोपाध्याय कृष्णशास्त्री घाटे, आणि नारायणशास्त्री पिंजरकर; आणि त्यांचा मी शिष्य, अशी परंपरा आहे. तीप्रमाणें "पुष्पसंगे कीटासहि घडे शिरीं वास" ह्या न्यायानें येथीलच एक विद्यार्थी असल्याचा मान मला मिळतो. आणि साहित्यशास्त्र मला येवो अथवा न येवो परंतु लहानपणापासून मला तें फार आवडतें ही गोष्ट खरी. आणि म्हणूनच पात्रापात्रतेवर विशेष लक्ष न देतां आपण माझी योजना केली असावी. तें कसेंहि असो; आपल्या कृपेनेंच कार्यसिद्धि होणार आहे. असें म्हटलें आहे कीं,

क्रियासिद्धिः सत्वे भवति महतां नोपकरणे"।

श्रीरामचंद्राच्या आज्ञेनें वानरांनीं समुद्रावर सेतू बांधला...त्यांत

"नैते ग्रावगुणा न वारिपु गुणा नो वानराणां गुणाः
श्रीमद्दाशरथेः प्रतापमहिमा सोऽयं समुज्जृंभते"॥

तेव्हां हें महत्कार्य आपल्या प्रभावानेंच होईल. निमित्तमात्रत्वानें राहण्याचें काम माझ्याकडे आहे.

माझें प्रेम साहित्यशास्त्रावर लहानपणापासून आहे असें विधान मीं पूर्वीच केलें आहे. त्याचा थोडक्यांत खुलासा असा कीं, वडिलांनीं मला लहानपणींच कै० नारायणशास्त्री पिंजरकर ह्यांचे पायांजवळ अभ्यास करावयास ठेविलें, त्यांनीं रूपावली, समासचक्र वगैरे शिकवून पंचकाव्याचा अभ्यास करविला आणि तो चालू असतांच सारस्वत आणि सिद्धान्तकौमुदी स्त्रीप्रत्ययान्त शिकविली.

पुढें मुंबईस कॉलेजांत गेलों तेव्हां तेथें कै० रामशास्त्री बोडस आणि वैकुंठवासी भीमाचार्य झळकीकर ह्यांचा सहवास घडला. त्यांत काव्याची गोडी पूर्वीच लागली होती. म्हण आहे कीं:—

संसारविषवृक्षस्य द्वा एव रसवत्फले ।
काव्यामृतरसास्वादः संगतिः सुजनैः सह ॥ "

ह्या दोनहि गोष्टींचा मला लाभ झाला, आणि हावऱ्या माणसाच्या स्वभावाप्रमाणें जितक्याचा होईल तितका संग्रह मी करून घेतला. ह्याचें कारण एकतर, मनाची आवड; आणि दुसरें असें कीं; जितकीं शास्त्रें पहाण्यांत आलीं त्यांत साहित्य, व्याकरण, न्याय, मीमांसा, आणि वेदांत, खेरीज करून इतर सर्व शास्त्रांत पाश्चात्य लोकांचें पाऊल पुढें दिसूं लागलें. तेव्हां असें वाटलें कीं, ज्या विषयांत आपल्या पूर्वजांनीं इतकी आघाडी मारिली आणि इतकें उंच स्थान मिळविलें कीं, तेथून पहातां मी-मी म्हणणारे पाश्चात्य अद्यापि जमीनीवरच खोल प्रदेशांत केवळ रांगत आहेत असेंच दिसतें, तेच विषय आपण शिकावे, म्हणून त्या उद्योगांस मी लागलों; तर असें दिसून आलें कीं, न्याय, व्याकरण, मीमांसा, आणि वेदांत, हे फार कठिण आणि गुरुगम्य; परंतु साहित्य मात्र सुगम, अति आनंददायक आणि अंतीं मोक्षाला नेणारें आहे. साहित्यदर्पणांत सांगितलें आहे कीं,

" चतुर्वर्गफलप्राप्तिः सुखादल्पधियामपि ॥
काव्यादेव यतस्तेन तत्स्वरूपं निरूप्यते ॥ "

हें मला खरें वाटलें; कारण, लक्षणावृत्तीचा विचार करीत असतां जहदजहल्लक्षणा " तत्त्वमसि " ह्या महावाक्याला लावावी लागते आणि ती यथार्थ कळली म्हणजे सर्व वेदांताची किल्लीच हातीं लागते.

" सोऽयमित्यादि वाक्येषु विरोधात्तदिदन्तयोः ।
त्यागेन भागयोरेक आश्रयो लक्ष्यते यथा ॥
मायाविद्ये विहायैवमुपाधी परजीवयोः ।
अखंडसच्चिदानंदं परं ब्रह्मैव लक्ष्यते ॥ "

व अद्यापि खरें वाटत आहे, म्हणून मी त्याचे सेवेंत आहें.

हा विदर्भदेश—ज्यांत आपण जन्मलों व राहतों—हा रुक्मिणीदमयंत्यादि पतिव्रता आणि अति सुंदर स्त्रियांच्या योगानें पुराणप्रसिद्ध आहे; इतकेंच नव्हे, तर ह्या देशांत इतके विद्वान् आणि दिगंतकीर्तीचे लोक रहात होते कीं, त्यांचा विचार प्रकट करण्याच्या पद्धतीला " वैदर्भी रीतिः " असें नांव पडलें आणि ती सर्वांत उत्तम होती असें साहित्यशास्त्रकारांनीं स्पष्ट नमूद करून ठेविलें आहे. वामनसूत्रांत लिहिलें आहे कीं,

" सूत्र ६– रीतिरात्मा काव्यस्य "
" सूत्र ७.–विशिष्टपदरचना रीतिः । "
" सा त्रिधा वैदर्भी गौडी पांचाली च । समग्रगुणा वैदर्भी ॥"
" अस्पृष्टा दोषमात्राभिः समग्रगुणगुंफिता।
विपंची स्वरसौभाग्या वैदर्भी रीतिरुच्यते ॥ "

उदाहरणः--

"गाहन्तां महिषा निपानसलिलं शृंगैर्मुहुस्ताडितं।
छायाबद्धकदम्बकं मृगकुलं रोमंथमभ्यस्यतु ॥
विश्रब्धं क्रियतां वराहततिभिर्मुस्ताक्षतिः पल्वले।
विश्रामं लभतामिदं च शिथिलं ज्याबंधमस्मद्धनुः ॥"

पुढें इतर रीतींचीं उदाहरणें देऊन वामन म्हणतात,

"तासां पूर्वा (वैदर्भी) ग्राह्या, गुणसाकल्यात्, न पुनरितरे, स्तोकगुणत्वात्।"

आणि शेवटीं लिहितात,

"वचसि यमधिगम्य स्पंदते वाचकश्री–
र्वितथमपि तथात्वं यत्र वस्तु प्रयाति।
उदयति हि ताडकापि वैदर्भरीतौ ॥
सहृदयहृदयानां रंजकः कोऽपि पाकः ॥

अशीं वचनें पुष्कळ काढून देतां येतील; परंतु तीं विस्तारभयास्तव देत नाहीं. सारांश, अशा देशांत उत्पन्न होऊन साहित्याचा अभ्यास न केला तर काय केलें ? हें साहित्यशास्त्र अति विस्तृत असल्यामुळें आज आपल्याला एक दोन तास अवकाश आहे त्यांत समग्र सांगतां येण्यासारखें नाहीं. त्याचें दिग्दर्शन केवळ शाखाचंद्रन्यायानें करूं म्हटलें तरी कठिण आहे. तरी कांहीं कल्पना येण्याकरितां थोडेंसें सुचतें तें सांगतों—

१. साधारण प्रत्येक शब्दाचे अर्थ तीन आहेत ते असेः–एक कोषबलानें निघालेला; दुसरा लक्षणावृत्तीनें निघालेला; आणि तिसरा व्यंजनावृत्तीनें उत्पन्न झालेला. शेवटल्या दोन वृत्तींचे पोटभेद पुष्कळ आहेत.

२ ज्या शब्दानें काव्य लिहिलें जातें तें गद्य असो पद्य असो, त्याचे भेद आणि विभाग.

३. काव्यांत मुख्यतः पाहिजे तो रस. त्याचे भेद नऊ आणि त्यांचा विस्तार.

४. काव्यांत वापरलेले अलंकार.

५. काव्यांत आणण्याची नायक–नायिकेची जोडी.

६. त्याचे भेद व वर्णनें.

७. काव्य, व त्याचे भेद आणि लक्षणें; नाटकें, वगैरे.

८. वृत्तें व त्यांचे प्रकार व लक्षणें.

९. भाव, विभाव, अनुभाव, त्यांचा विस्तार.

१०. योजना, कल्पना, वगैरे.

११. ह्या सर्वांच्या अंगभूत इतर गोष्टी.

ह्या शिवाय इतर बाबी साहित्यशास्त्रांत प्रवीण असलेले पंडित सांगूं शकतील. आणि त्यांचें वर्गीकरण करून संख्या अधिक किंवा कमी करूं शकतील. परंतु आपणांस कल्पना यावी म्हणून कांहीं तरी सांगितलें पाहिजे म्हणून सांगितलें. मुद्दा हा आहे कीं, हा शोधपकणा, ही बारिकी, आणि इतकें सविस्तर वर्णन, संस्कृताखेरीज कोणत्याहि भाषेंत मला आढळून आलें नाहीं म्हणून मनाला आनंद झाला, आणि त्यांतच मन रमलें.

मला पूर्वी जें विधिरूपानें पूर्णपणें सांगतां आलें नाहीं, तें किंचित् वादमुखानें सांगतां यावें म्हणून जणूं काय अलीकडे कांहीं विद्वान लोकांनीं असें मत प्रदर्शित केलें आहे कीं पाश्चात्य देशांतील

आणि विशेषतः इंग्लंडांतील काव्यासंबंधानें वाङ्मय आपल्याकडील वाङ्मयापेक्षां अधिक उच्च दर्जाचें आहे. हें मला पसंत नाहीं म्हणून संक्षेपांत सांगतों.

कोणतीहि भाषा उच्च पदवीस चढण्यासाठीं व्याकरणबद्ध पाहिजे. संस्कृत भाषेला जसें महर्षि पाणिनीनें अष्टाध्यायींत बांधून टाकिलें, तशी कोणत्याहि भाषेची व्यवस्था केली नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे, आणि सर्व पाश्चात्यांनीं पूर्णपणें कबूल केली आहे. सबब आपली ह्या बाबतींत महती पूर्ण व अबाधित आहे.

पूर्वी साहित्यशास्त्राची महती वर्णन करतांना मीं ज्या अकरा बाबी सांगितल्या त्यांपैकीं एकहि बाबीवर पूर्ण आणि सन्माननीय ग्रन्थ इंग्रजींत किंवा हल्लीं प्रचलित असलेल्या प्राचीन किंवा अर्वाचीन भाषांत आढळून येत नाहीं, फक्त उपमा, रूपक, इत्यादि उघड, ठळक अलंकार मात्र दिसून येतात. आणि त्यांचें वर्णन त्रोटकच आहे. हें "Rhetoric" नांवाखालीं असतें. परंतु सर्व अलंकारांचा परामर्ष करून विवेचन करणारा निबंध दिसून येत नाहीं. मग रस व त्यांचे भेद दाखविणाऱ्या ग्रंथांची गोष्ट कशाला ?

न्यायशास्त्राबद्दल पाहिलें तर तसेंच दिसून येतें. इंग्रजी भाषेंतील "Logic" आणि आपलें न्यायशास्त्र एकच किंवा सारखें नाहीं? न्यायशास्त्र हें स्वतंत्र अध्यात्मशास्त्र आहे, तसें इंग्रजी "लॉजिक्" नाहीं. त्याची व्याप्ति अनुमान काढण्यापलीकडे नाहीं. आणि योग्य अनुमान करण्यास व्याप्तिग्रह करावा लागतो. तो करण्यासाठीं त्यांचे येथें "इंडक्शन" हा त्यांचे लॉजिकचा भाग कल्पिला आहे. आणि "डिड्क्शन" म्हणजे "इंडक्शन'–नें काढलेले सामान्य नियम लावून ताडून पहाण्याचे नियम आहेत. त्यासाठीं ते तीन अवयवांचें वाक्य "सिलोजिझम्" नांवाचें करितात तो तीन वाक्यांचा आहे. आपण पांच अवयवांचें वाक्य करितों, आणि त्यांच्या "सिलोजिझम्"-पेक्षां तें चांगलें आहे असें आतां बऱ्याच अंशीं कबूल झालें आहे. त्यांच्यांत "undistributed middle" हेत्वाभास पुष्कळ. ते आपल्या पंचावयव वाक्यांत होत नाहींत. ह्या ठिकाणीं विषय सांगोपांग सांगण्यास अवसर नाहीं. परंतु अबाधित सिद्धान्त असा निघतो कीं, ह्याहि शास्त्रांत आपली प्रगति झाली आहे तितकी पाश्चात्यांची नाहीं. ते आपल्या फार मागें आहेत.

त्यांच्यांत मीमांसाशास्त्र उत्पन्न होण्यास वाव नाहीं. कारण शब्दप्रमाण ते फारसें मानीत नाहींत. वाच्यार्थ लाविण्यासाठीं आणि तात्पर्य काढण्यासाठीं जे परिश्रम आमच्याकडे केले गेले आहेत त्याचा लक्षांशहि इंग्रजींत नाहीं.

पश्चिमेकडील "थीऑलॉजि" आपल्या वेदांताची कांहीं अंशीं साम्यता कदाचित् करील असें सत्कृदर्शनीं वाटतें. परंतु विचारांतीं हेंहि मत निराधार दिसतें, हें त्यांचे ग्रंथ पाहिले म्हणजे समजतें. एतावता आपल्याकडील कांहीं मंडळींनीं पाश्चात्य वाङ्मयाचें विनाकारण स्तोम माजवून आपल्याकडील वाङ्मयाचा अधिक्षेप केला आहे. तो संस्कृतांत म्हणतात त्याप्रमाणें क्षोदक्षम नाहीं. आपल्याकडे साहित्य, व्याकरण, न्याय, मीमांसा, आणि वेदांत, ह्या शास्त्रांत जितकी प्रगति झाली आहे तिच्या पासंगासहि पाश्चात्यांची पुरावयाची नाहीं. असो. हा वाद अधिक लांबविण्यांत अर्थ नाहीं. तो मी आजचा आपला जो "साहित्यशास्त्र" विषय आहे त्याचें महत्त्व दाखविण्यासाठीं आणिला आणि त्याचा समाचारहि ओझरताच घेतला आहे. आपल्याकडे साहित्यशास्त्रास इतकें महत्त्व दिलें आहे कीं, त्याचे नियम सर्व अभिजात लेखकांनीं पाळिले आहेत, आणि ते मानवी-प्राण्याचे सहज स्वभावावर इतक्या कुशलतेनें बसविले गेले आहेत कीं, ते एकदां लक्षांत आले म्हणजे अंगचे होतात व सहज पाळले जातात. हें शास्त्र नैय्यायिकांचें फार आवडतें, किंबहुना

परिक्षेचा विषय होऊन बसलें आहे. ज्याप्रमाणें वेदांतशास्त्रांत नवीन मत प्रगट करणाराला प्रस्थानत्रयी करावी लागते, त्याप्रमाणें नदियाशांतिपूरांत "भट्ट" ही पदवी मिळविण्यासाठीं "गदाधारी" इत्यादि मोठे ग्रंथ शिकल्यावर एक साहित्यावर निबंध लिहावा लागतो; न लिहिला तर ती पदवी मिळत नाहीं.

इंग्रजींत एक अशी म्हण आहे कीं, जगाची कल्पना यथार्थ होण्यासाठीं सर्व प्रकारच्या माणसांचा त्यांत समावेश करावा लागतो. हें म्हणणें अगदीं खरें आहे. अशा सुंदर, मोहक, अनंत सुखदायी साहित्यशास्त्राची निंदा करणारे लोक पूर्वी होऊन गेले, आणि अद्यापीहि कदाचित् कानाकोपऱ्यांत असतील. हे " रंडागीतानि काव्यानि " असें म्हणून सर्वांवरच बोळा फिरवूं पाहतात. त्यांना काय म्हणावें ! त्यांच्यापेक्षां ज्याचा अपराध फार जहाल आहे त्यांच्याविषयीं दशरूपककार म्हणतात,

आनंदनिस्यन्दिषु रूपकेषु। व्युत्पत्तिमात्रं फलमल्पबुद्धिः ॥
योपीतिहासादिवदाह साधुः । तस्मै नमः स्वादुपराङ्मुखाय ॥

जे काव्यनाटकांत व्युत्पत्ति किंवा इतिहासाचा शोध करितात त्यांना नमस्कार घालून सोडून दिलें आहे. तर काव्यच नको म्हणणाराला आपणहि नमस्कार करून, त्यांना दुराराध्य मानून सोडून द्यावें हें बरें. फार कशाला, ज्या संस्थेच्या सहाव्या अधिवेशनास आज प्रारंभ होत आहे, ती संस्था कशाला निर्माण केली असें म्हणणारे, आणि ज्ञाते म्हणविणारे लोक पूर्वी होते व आतांहि त्यांपैकीं कित्येकांनीं स्वर्गीय पुष्प " पारिजात " असें तात्पुरतें नांव घेऊन एक लेख लिहिला आहे; आणि त्याला मी उत्तर द्यावें असें सुचविण्यांत आलें आहे. हें काम मला तोलेल असें दिसत नाहीं. पारिजातक नुसतें फूल होऊन आलें होतें तेव्हां त्यानें परमात्मा कृष्णाला इंद्रादि देवांशीं युद्ध करावयास लाविलें होतें. ह्याच प्रसंगावर "पारिजातकानिमित्त भामा रुसली श्रीहरिवरी । तिला समजावी बहुपरी" अशी एका मराठी कवीनें फार सुंदर कविता रचिली आहे. श्रीकृष्णानीं तें घरीं आणिलें तेव्हां रुक्मिणी आणि सत्यभामा ह्यांच्यांत कलह आणिला. प्रभूला समजूत काढण्यासाठीं मोठे परिश्रम पडले. अशी कथा पुराणप्रसिद्ध आहे. आतां तर तें पुष्प चालत्याबोलत्या शिकल्यासवरल्या पुरुषाचें रूप घेऊन आलें आहे तर त्यापुढें माझें काय चालणार ? ह्या युगाचा धर्मच असा आहे कीं, कोणी आपाततः कां होईना एकदां विधान करून गेला म्हणजे त्याला त्या विधानाच्या सत्यत्वाबद्दल अभिमान उत्पन्न होतो, आणि जर कोणीं दुसऱ्यानें निषेध केला तर तो अभिमान अभिनिवेशांत परिणाम पावतो; आणि पुनः निषेध कोणी केला तर तो अभिनिवेश प्रतिनिविष्ट होतो आणि मग

" ब्रह्मापि तं नरं न रंजयति "

असा प्रसंग दिसूं लागतो. अशी परिस्थिति उत्पन्न झाली असतां वादविवादांत न पडतां आपण आपलें उद्दिष्ट काम करण्यास शांततेनें सुरुवात करावी आणि खबरदारी घ्यावी, कीं कोणत्याहि प्रकारें कोणासहि, आणि विशेषतः त्या विधानकारास, यत्किंचितहि कायावाचामनेंकरून दुखवूं नये. म्हणजे आपण करितों तें काम चांगलें असेल तर तोच गृहस्थ आपला मित्र आणि साहायक होतो. निदान तटस्थ तरी राहतो. आणि अंतराय तरी उत्पन्न करीत नाहीं. ह्या प्रसंगीं हाच मार्ग स्वीकारावा असें मला वाटतें. कारण "पारिजाता"-नें केलेल्या आक्षेपास आपल्या सभेचे उपाध्यक्ष श्री. यादव माधव काळे, आणि अध्यक्ष श्री. नरसिंह चिंतामण केळकर, रा. ब. चिंतामणराव वैद्य, अशा मोठ्या विद्वानांनीं सविस्तर उत्तरें दिलीं आहेत; आणि वारंवार फार कळकळीनें प्रतिपादन केलें आहे कीं, ही संस्था कोणाचाहि विरोध करण्यासाठीं अस्तित्वांत आली नाहीं.

" सर्वेषामविरोधेन "

हें हिचें ब्रीदवाक्य आहे. आणि ती आपल्याला "महाराष्ट्र-साहित्य-सभे"-ची शाखा समजते. हीच गोष्ट गेल्या वर्षी खानदेशांत स्वागताध्यक्ष श्री० सोनाळकर ह्यांनीं फार परिणामकारक प्रकारानें सांगितली. इतकेंहि करून ज्याची शंका दूर झाली नाहीं ती कितीहि म्हटलें तरी दूर होईल असें मला वाटत नाहीं.

विदर्भांत निर्माण झालेल्या वाङ्मयाचें विहंगावलोकन करावें असेंहि मला सुचविलें गेलें आहे. हें काम गेल्या वर्षी स्वागताध्यक्ष श्री. सोनाळकर ह्यांनीं इतकें उत्तम आणि व्यापक दृष्टीनें केलेलें आहे कीं, तेंच येथें उतरून घ्यावेसें वाटतें; तसें केलें तर पुनरुक्तीचा दोष येईल. श्री. सोनाळकर हे स्वतः प्रसिद्ध कवि आहेत. त्यांची वाणी रसाळ आहे. म्हणून जिज्ञासूंनीं ती माहिती त्यांचे भाषणांतून घ्यावी.

मला एक अशी सूचना कराविशी वाटते कीं, ह्या देशांत प्रचलित असलेल्या लिपी काढून त्यांचे ऐवजीं "इटॅलिक्स" जिला म्हणतात, आणि जींत इंग्रजी हल्लीं लिहिली जाते ती उपयोगांत आणावी अशी कल्पना कांहीं स्थळीं शिजत आहे असें वाटतें. आंग्लोन्यास जो प्रकार झाला त्यावरून ह्या प्रकरणास उत्तेजन मिळालें असावें असें वाटतें. आपणांतहि "बाळबोध" लिपि सर्वत्र वापरण्यांत यावी असा उद्योग चालू आहे, आणि तो आम्हांला आवडतो. ह्याचें कारण असें कीं, ती लिपी आमचीच असून फार दिवसांपासून प्रायशः संस्कृत ग्रंथांसाठीं वापरली जाते. मद्रासेकडे संस्कृत आपल्या लिपींत लिहितात ही गोष्ट खरी आहे; पण तेथें बाळबोध अज्ञात आहे असें नाहीं. म्हणून बाळबोधीची गोष्ट निराळी. "इटॅलिक्स" ही परदेशी आहे; तिच्यांत उच्चारांचा नियम नाहीं. आणि प्लुत, उदात्त, अनुदात्त स्वरित, वगैरे दाखविण्याची सोय नाहीं. आणि नवी सोय केली तरी ती अपरिचयानें जाचक होणार. आणि तूर्त असलेल्या आणि होणाऱ्या आणि अद्यापीहि अप्रसिद्ध ग्रन्थांची गैरव्यवस्था होणार हें लक्षांत घेतलें म्हणजे नवीन घटना होऊं घातली आहे ती न होईल तर बरी असें वाटतें. आपणांस योग्य वाटल्यास ह्यासंबंधीं एक ठराव करावा. मला अशी एक सूचना आली आहे कीं, विदर्भी भाषेची पात्रता, वाक्प्रचार, म्हणी आणि शब्द, हे सर्वसामान्य भाषेच्या व्यवहारांत आणण्यासंबंधानें चार शब्द बोलावे. मराठी भाषा ही समुद्राप्रमाणें आहे. जसा हिंदीमहासागर एकच आहे. त्याचा एक भाग बंगालजवळ आला 'बंगाली उपसागर' म्हणूं लागले; जो भाग खंबाइता जवळ आला, त्यांस 'खंबायतचें आखात' नांव पडलें; आणि परशियाजवळ गेला त्याला 'पर्शियन गल्फ' अशी संज्ञा मिळाली. वस्तुतः ह्या तिघांत कांहीं भिंती घालून वांटणी कोणी केली नाहीं; लोकांनीं आपल्या सोयीसाठीं हे विभाग कल्पिले आणि निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. तद्वतच मराठी भाषा बोलणारांनीं मोठा प्रदेश भरतखंडांत व्यापिला, आणि त्याचे कालांतरानें निराळे विभाग पाडले, आणि त्या-त्या विभागांत बोलल्या जाणाऱ्या भाषांना 'पुणेरी' 'खानदेशी,' 'वऱ्हाडी,' 'नागपुरी,' आणि 'मोंगलाईतील' अशीं नांवें पडलीं म्हणून त्या भाषा भिन्न आहेत असें मानितां येत नाहीं. विदर्भीची गोष्ट घेतली तर ती मराठीच असून तींत ज्ञानेश्वरमहाराज, नामदेव, तुकाराम, रामदास, दासोपंत, एकनाथमहाराज, शिवदिनकेसरी, देवनाथ, दयाळनाथ, वगैरे पुष्कळ होऊन गेले. शिवाय, तिला संस्कृताचें पाठबळ आहे. तेव्हां तिला अपात्र म्हणण्यास कोण धजाऊं शकतो ? तिच्यांतील शब्द, म्हणी, आणि वाक्प्रचार, उपयोगांत आणणें, आणि सामान्य मराठी वाक्यांत मिसळून देणें, हें, कवि, नाटककार, लेखक, वर्तमानपत्रकार, आणि वक्ते, ह्यांचें काम आहे. तसेंच, मुत्सद्दी आणि राजकार्य करणारे ह्या कार्याला मदत करूं शकतात. त्यांची संख्या आपणांत जशी वाढेल आणि सर्वमान्य होईल तशी विदर्भी भाषा सर्वतोमुखीं होईल. आपण जो संघ स्थापन केला आहे आणि समाज भर-

विला आहे, त्यांत जमलेले लोक हेहि ह्या गोष्टीचे पुरस्कर्ते आहेत. असे संघ प्रत्येक गांवीं, शाळेंत आणि विश्वविद्यालयांत, होतील, तर काम पुष्कळ पुढें जाईल. आपणांत उत्तम वाङ्मय जितकें अधिक होईल, तितकी विदर्भाची महती वाढेल.

पुढील कार्य कसें करावें ह्याविषयीं मला बोलावयाचेंच होतें. आणि त्याबद्दल मला सूचना दोन बाजूंनीं आल्यामुळें बोलण्याचा अधिक उत्साह वाटतो. प्रथमतः आपल्या संस्थेच्या शाखा आणि उपशाखा जितक्या जिल्ह्यांत होऊं शकतील तितक्या जिल्ह्यांतच काय पण तालुक्यांत आणि शहरोशहरीं स्थापाव्या. त्यांचीं नांवें 'शारदाश्रम' किंवा 'शारदामंडळ' गांवच्या नामानिर्देशपूर्वक असावीं. उदा०—यवतमाळास असा एक "शारदाश्रम" स्थापन झाला आहे. त्यानें हस्तलिखित ग्रन्थसंग्रह, शिलालेख, ताम्रपट, व ऐतिहासिक लेखसंग्रह, करण्याचें काम सुरू केलें आहे; आणि त्यांत बरेंच यश मिळविलें आहे. आतांपर्यंत त्यांनीं "महानुभावीय वाङ्मय", "श्रीविष्णुदासांची कविता", आणि "ऋद्धिपूरवर्णन", असे तीन ग्रंथ प्रकाशित केले आहेत. ही संस्था १९२९ इ० म्हणजे ह्याच सालीं निघाली आहे; आणि साहित्य-मंडळाच्या देखरेखीखालीं आपलें काम करते. आपल्या संस्थेचे उपाध्यक्ष श्री. यादव माधव काळे, श्री. यशवंत खुशालराव देशपांडे, एम्. ए. एल्‌एल्. बी., आणि दुसरे पदवीधर नांवाजलेले विद्वान्, हेंत आहेत. ह्यांची कामगिरी येथें "Historical Commission"-ची बैठक झाली तेव्हां त्यांचे दृष्टीस आली, आणि त्या "कमिशना" चे अध्यक्ष सर यदुनाथ सरकार ह्यांनीं ह्या "शारदाश्रमा"-च्या उपयुक्ततेचा उल्लेख करून, असेच प्रयत्न चोंहोकडे व्हावे, असा शेरा दिला आहे. जितक्या अशा संस्था निघूं शकतील तितक्या काढाव्या. आपल्याकडे कवि होण्याची इच्छा करणारे तरुण पुष्कळ आहेत. परंतु त्यांना मार्गदर्शक कोणी नाहीं, म्हणून त्यांची पुष्कळ मेहनत वांया जाते. तसें न व्हावें, म्हणून क्षेमेंद्रानें, कवि होण्यास काय काय करावें ह्यासंबंधीं ग्रंथ केला आहे. तो संग्रहीं ठेवून होतकरू मुलांस त्यासंबंधीं व्याख्यानें वगैरे द्यावीं.

दुसरी गोष्ट अशी कीं, आपल्या संस्थेविषयीं सहानुभूति वाढविण्यासाठीं, आणि कार्याची जाणीव सर्व लोकांना व्हावी म्हणून, एक लहानमोठें मासिक अथवा त्रैमासिक नियतकालीं निघणारें पत्र, आपलें असावें.

तिसरी बाब अशी कीं, आपल्या लहान लहान कमिट्या सर्व ठिकाणीं असाव्या, आणि त्यांनीं साहित्य आणि वाङ्मय ह्या संबंधानें चर्चा करून तें लोकांच्या दृष्टीस आणावें. ह्या सर्व कामासाठीं द्रव्याची जरूरी आहे; आणि तें कसें मिळावें ह्याबद्दल सर्वांत मोठा प्रश्न आहे. त्याचा विचार करितां असें दिसून येतें कीं, हा काळ असा आहे कीं, सार्वभौम राजापासून अगदीं गरीबापर्यंत सगळ्यां-नाच द्रव्याचीच चिंता लागली आहे. सार्वजनिक अशीं उपयोगाचीं हीं कामें द्रव्याभावास्तव लांबणी-वर टाकिलीं जात आहेत. म्हणून हा प्रश्न सोडविणें सहज किंवा साधें नाहीं. तथापि मार्ग तर काढला पाहिजेच म्हणून कांहीं सूचना करितों. आपणांला जमा धरण्याजोगी बाब कोणती आहे ही पाहूं गेलें असतां असें दिसतें कीं, बहुतेक चांगलीं वृत्तपत्रें आपणांस अनुकूल आहेत. त्यांचे संपादक आपणासंबंधीं लेख लिहितात आणि आपलें काम वाचकांच्या निदर्शनास आणितात. त्यांना आपण अशी विनंति करावी कीं, त्यांचेकडे जीं पुस्तकें अभिप्रायासाठीं येतील त्यावर त्यांना वाटल्यास त्यांनीं स्वतंत्र अभिप्राय द्यावा; तसें करण्याचा त्यांना स्वतःसिद्ध हक्क आहे, व तो अबाधित रहावा; परंतु त्यांनीं परिक्षेसाठीं आलेलीं पुस्तकें, ही संस्था नेमून देईल त्या कमिटीकडे पाठवावीं, आणि कमिटीचे अभिप्रायहि प्रसिद्ध करावे. असें केल्यानें आपल्या कमिटीसहि काम राहील, आणि लोकांच्या दृष्टीस पडेल. होतकरू ग्रन्थकारांनींहि आमच्या कमिटीचा, होऊं शकेल तितका, उपयोग करून

घ्यावा. आमच्या कमिट्यांनींहि त्यांना सूचना वगैरे देऊन मदत करावी. असे आपण उपयोगी पडूं लागलों म्हणजे कोणाहि सरस्वतिभक्तास प्रेरणा होऊन तो आपणांस मदत करील.

शाळेंतील क्रमिक पुस्तकांवर आपल्या कमिट्यांनीं लक्ष ठेवावें, आणि हीं पुस्तकें तयार करणारांस योग्य त्या सूचना कराव्या. शिवाय, पुराणिक, कीर्तनकार, नाटककार, वगैरे मंडळींची दृष्टि आपल्याकडे असल्यास बरीच प्रसिद्धि वाढून आपणांस मदत होण्याचा संभव आहे. शेवटीं आपल्या मंडळींकडून, आणि साहित्यप्रेमी लोकांकडून, वर्गणी मागण्याचा जुना मार्ग कायम आहेच.

आपण माझें हें लांबलेलें भाषण शांतपणें ऐकून घेतलें. ह्याबद्दल मी आपला फार आभारी आहे.

### समारोप

"परिषदेचा उपसंहार करावयाचा, याचा अर्थ नाश नव्हे; नाहींतर 'वेणीसंहार' म्हणजे वेणी कापून टाकली, असा अर्थ करावा लागेल ! ( हंशा ) हा उपसंहार म्हणजे परिषदेचा समारोप होय. दोन दिवस जमून आपण पुढील कार्याची रूपरेषा आंखली. त्याप्रमाणें कार्य केल्यास पुष्कळ प्रगति होईल. वाङ्मयांत काव्य तर येतेंच; पण इतरहि विषय येतातच. म्हणूनच आपल्या कार्यक्रमांत ठराव भाषणें, निबंध वगैरेंत मधून मधून कवितागायनहि ठेवलें होतें. कवींनीं

### उत्तम काव्याची निर्मिति

करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. त्यासाठीं त्यांनीं अभ्यास केला पाहिजे. उठल्या सुटल्या काव्य करणारे कवी पूर्वी नसत. गुरूजवळ विद्या शिकून काव्याची पूर्ण माहिती करून घेऊन नंतर काव्यें रचीत. पूर्वी प्रत्येक कवीला पूर्वतयारीसाठीं क्षेमेंद्राच्या ग्रंथाचें अध्ययन करावें लागत असे. अंगीं गुण असला, तरीहि तयारी करावी लागते; प्रतिभा संपादावी लागते. खाणींतून बाहेर निघणाऱ्या हिऱ्याला पैलु पाडल्यावर त्याचें तेज चकाकतें. प्राचीन कवि पूर्वजन्मींचे संस्कार घेऊन येत व तपश्चर्या करीत. अभ्यास करणें हीच तपश्चर्या होय. हिरा पैलू पाडून कोंदणांत बसविल्यानें जसा सुंदर दिसतो; त्याचप्रमाणें कवीनें अभ्यासाच्या कोंदणांत काव्य बसविलें पाहिजे. प्रत्येक

### कवीला 'कविपरिचय' अवश्य

लागतो. आपण कालिदासाचेंच जरी उदाहरण घेतलें तरी त्याला दारिद्र्याच्या उपद्रवाची माहिती, चोरी कशी करावी याचें ज्ञान, वेश्यापरिचय ( हंशा ), न्यायप्रकरणाची माहिती, खल-स्वभाव वगैरे गोष्टींचा उत्तम परिचय होता, असें दिसून येतें."

---

# शुद्धलेखन कमिटी

## पहिल्या बैठकीचा वृत्तान्त

बेळगांवच्या साहित्य-संमेलनांत ठरल्याप्रमाणें शुद्धलेखन कमिटीची बैठक ता. ११-१२ ऑगस्ट रोजीं पुणें येथें भारत-इतिहाससंशोधक मंडळांत भरली होती. त्या वेळीं कमिटीपैकीं खालील गृहस्थ हजर होते:-श्री. ना. गो. चापेकर, श्री. चिं. वि. वैद्य, श्री. ब. ग. खापर्डे, श्री. रा. दा. देसाई, श्री. कृ. पां. कुलकर्णी. कमिटीचे दुसरे दोन सभासद श्री. न. चिं. केळकर व श्री. ना. दा. बनहट्टी हे या बैठकीस हजर राहूं शकले नाहींत.



अनुक्रमणिका

जादा सभासद घेण्याचा अधिकार कमिटीला आहे किंवा नाहीं याचा संशय असल्यामुळें प्रथम गैरसमजानें श्री. रं. बा. रड्डीशास्त्री व श्री. गो. कृ. मोडक यांना सभासद करून घेण्यांत आलें होतें. परंतु तसा अधिकार या कमिटीला नाहीं असें कमिटींत निश्चितपणें ठरल्यावर वरील गृहस्थांस चुकीनें सभासद करून घेतलें याबद्दल दिलगिरीचीं पत्रें पाठविण्याचें ठरलें.

यानंतर कामास सुरुवात झाली. प्रथम निरनिराळ्या गृहस्थांकडून आलेलीं पत्रें व त्याचप्रमाणें श्री. कुलकर्णी यांच्या प्रश्नावलीचीं उत्तरें बैठकींत वाचलीं गेलीं.

शुद्धलेखनासंबंधीं सामान्य तत्त्वें सभेला जीं ग्राह्य वाटलीं व विवेचन करतांना जीं उपयुक्त होतील असें सभेला वाटलें तीं निश्चित करण्यांत आलीं. तीं तत्त्वें येणेंप्रमाणें:-

(१) केवळ उच्चाराप्रमाणेंच लेखन असावें हें तत्त्व ह्या कमिटीस संमत नाहीं.

(२) परंपरा, वर्तमान रूढि, व्युत्पत्ति व उपयुक्तता यांचा विचार करून शुद्ध-लेखनाचा निर्णय व्हावा.

वरील तत्त्वांना अनुसरून कमिटीनें ज्या प्रश्नांचा विचार करून सध्या एक-मतानें तात्पुरता निर्णय ठरविला ते प्रश्न व त्यांचे निर्णय खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—

### अनुस्वार

(अ) मराठीमध्यें परसवर्णाच्या ठिकाणीं नेहमीं शीर्षबिन्दु द्यावा. अर्थभेद होत असेल तर मात्र परसवर्णच लिहावा.

उदा.—देहांत (सप्तमी); देहान्त (शिक्षा).

(आ) य, र, ल, व, श, ष, स, ह, ज्ञ यांच्या पूर्वीच्या अनुस्वाराबद्दल केवळ शीर्षबिंदूच द्यावा. उदा.—सिंह, संसार.

(इ) नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्य रूपांवर शीर्षबिंदु द्यावा. उदा.—लोकांस, टिळकांस.

(ई) नपुंसकलिंगी एकारान्त शब्दांच्या एकवचनी व अनेकवचनी रूपांवर शीर्षबिंदु द्यावा. उदा.—केळें, केळीं; बोलणें, बोलणीं.

(उ) नपुंसकलिंगी ईकारान्त शब्दांच्या एकवचनी रूपांवर शीर्षबिंदु नसावा. उदा.—पाणी, दहीं, मोती.

(ऊ) हांस, धांव, केंस, कांच, लांकूड इत्यादि शब्दांवरील शीर्षबिंदु गाळावेत.

(ए) मी तृतीयान्त असतांनाहि त्या शब्दावर शीर्षबिंदु देऊं नये. उदा—मी केलें.

तूं ह्या सर्वनामावर प्रथमा व तृतीया असतां बिंदु द्यावा आम्ही, तुम्ही यांवर प्रथमा विभक्ति असतांना बिंदु देऊं नये. उदा.— आम्ही जातों; तुम्ही बोलतां.

(ऐ) मराठींत व्युत्पत्तीनें आलेले अनुनासिक शीर्षबिंदू अर्थभेदास जरूर असतील तेथेंच कायम ठेवावेत. उदा.— नांव, नाव; पांच, पाच; इतरत्र गाळावेत. उ. गाव.

### विभक्ति प्रत्ययांवरील अनुस्वार

(ओ) तृतीया–ने, नी–शीर्षबिंदूविरहित. आं, एं, ईं हे शीर्षबिंदूसहित लिहावेत.

द्वितीया व चतुर्थी:– ना-ना- बिंदुरहित

सप्तमी:– ईं आं-बिंदुसहित.

### क्रियाविशेषण अव्ययें

(औ) स्थलकालवाचक अव्ययांवर बिंदु देऊं नये. उदा.–जेथे, तेथे, एकदा, दोनदा, आता, कधी.

(अ) धातुसाधित क्रियाविशेषणांवर शीर्षबिंदु द्यावा. उदा.-करूं, चालूं, जातां, बोलतांना.

### ऱ्हस्वदीर्घ अन्त्यस्वर

(क) मराठींतील ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त तत्सम शब्द प्रथमेच्या एकवचनांत ऱ्हस्व लिहावेत. अनेकवचनांत दीर्घ लिहावेत.

(ख) ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त तत्सम अव्ययें ऱ्हस्वान्त लिहावीं. उदा:– परंतु, अद्यापि, यथामति.

### उपान्त्य स्वर

(ग) अकारान्त तत्सम शब्दांतील उपान्त्य स्वर ऱ्हस्व इ किंवा उ असल्यास तो ऱ्हस्व इ किंवा उ मराठींत प्रथमेच्या दोनहि वचनांत ऱ्हस्वच लिहावा. उदा.—गुण.

(घ) कोल्हापूर, नागपूर, इत्यादि तद्भव शब्दांतील उपान्त्य अक्षरांतील उकार दीर्घ लिहावा.

(ङ) उपान्त्य दीर्घ ई ऊ असलेले अकारान्त तत्सम शब्द मराठींत आत्मसात् झाले असल्यास सामान्यरूपाचे वेळीं त्यांचा उपान्त्य स्वर ऱ्हस्व लिहावा. उ.—शरीर शरिराचा. आत्मसात् न झालेल्या शब्दांच्या बाबतींत मात्र दीर्घच कायम ठेवावा. –सूत्र-सूत्रांत, गीता—गीतेंत.

### कांहीं शब्द

(च) राहणें, वाहणें, पाहणें, हीं रूपें शुद्ध समजावीं. वहाणें, वाहाणें, रहाणें, राहाणें, पहाणें, पाहाणें हीं अशुद्ध समजावीं.

कोणत्या, एखादा हीं रूपें ग्राह्य, कोणच्या, एकादा, हीं अग्राह्य. हि अव्यय ऱ्हस्व लिहावें. हि, च, देखील, सुद्धां, हीं अव्ययें शब्दाला जोडून लिहावीं.

उरलेल्या मुद्द्यांचा विचार कमिटीच्या पुढील बैठकींत करण्यांत यावा असें ठरलें. या निर्णयासंबंधानें ज्या कोणांस आपलें मत व्यक्त करावयाचें असेल तें त्यांनीं कृपा करून चिटणिसाकडे लवकर कळवावें.

कृ. पां कुलकर्णी
७१९ सदाशिव पेठ पुणें.

ना. गो. चापेकर
अध्यक्ष

प्रयोजनवाची अर्थ करण्याचें कांहीं कारण नाहीं. पूरुषादः हें वयः ह्याचें विशेषण आहे, गौः ह्याचा अर्थ प्रत्यंचा असा यास्क व सायण ह्या दोघांनीं केला आहे. परंतु ऋचेचा अर्थ निराळा आहे असें मला वाटतें. ह्याच्या आधींच्या ऋचेंत वज्राचें वर्णन आहे. तेव्हां गौः याचा अर्थ वीज असा होणें शक्य आहे. ऋचेचा अर्थ खालीं दिल्याप्रमाणें असावा.

" वीज ( गौः ) झाडांवर पडून गडगडाट करते. त्याबरोबर प्रेतें खाणारे पक्षीहि भीतीनें वर उडतात. " ह्या ऋचेचा दुसरा अर्धः 'अयेदं विश्वं भुवनं भयात इन्द्राय सुन्वदृषये च शिक्षत्' असा असून त्याचा अन्वयार्थ असा आहेः— अथ इदं विश्वं सर्वं भुवनं जगत् भयाते बिभेति। ऋषिः इन्द्राय सोमं सुन्वत् सुनोति। इन्द्रश्च ऋषये शिक्षत् धनं ददाति = (वीज पडून पक्षी उडतात) तेव्हां सगळे जग तें पाहून भितें व भिऊन ऋषी इंद्राला सोम अर्पण करून त्याचा राग नाहींसा करतो; इंद्र ऋषीला धन देतो.

गौः=माध्यमिका वाक् असा अर्थ यास्क व सायण ह्यांनीं इतर ठिकाणीं केला आहे. तोच अर्थ येथें करण्यास कांहीं हरकत नाहीं.

**आदित्यः अपि गौः उच्यते**

आदित्याला सुद्धां गौः म्हटलें आहे.

**"उतादः परुषे गवि" ( ऋ. सं ६।५६।३)**

परुषे=पर्ववति=ज्याला पेरें (पर्व) म्हणजे अहोरात्र वगैरे भाग आहेत अशा आदित्याच्या ठिकाणीं. कालाचे लहान मोठे सर्व भाग आदित्य घडवून आणतो. ते त्याच्या शरीराचें अवयव होत.

**भास्वति इति औपमन्यवः**

परुषे=भास्वति म्हणजे प्रकाशानें युक्त अशामध्यें असा औपमन्यव अर्थ करतो. सगळी ऋचा खालीलप्रमाणें आहे.

उतादः परुषे गवि सूरश्चक्रं हिरण्ययम्। न्यैरयत् रथीतमः=उत रथीतमः सूरः अदः हिरण्ययं चक्रं परुषे गवि न्यैरयत् = आणखी सर्वांत शूर (रथीतमः) असा सूर्य आपलें सोनेरी चाक निरनिराळ्या रंगांनीं चित्रविचित्र असलेल्या (परुषे) आकाशांत (गवि) फिरवितो (न्यैरयत्). येथें गो शब्दाचा अर्थ आदित्य नाहीं. देवांना जसा गो शब्द लावतात तसा अंतरिक्षालाहि लावला आहे.

**अथापि अस्य एकः रश्मिः चन्द्रमसं प्रति दीप्यते**

आणखी ह्याचा ( आदित्याचा ) एक किरण चंद्राकडे जाऊन त्याला प्रकाशित करतो.

**तत् एतेनं उपेक्षितव्यम्**

तें खालील ऋचेवरून ध्यानांत आणावें. एतेन ह्याचा मंत्रार्थ जाणण्याची इच्छा करणारा शिष्य असा नेहमींप्रमाणें दुर्ग अर्थ करतो.

**आदित्यतः अस्य दीप्तिः भवति इति**

आदित्यापासून ह्याची ( चंद्राची ) दीप्ति ( प्रकाश ) होते ( चंद्राला प्रकाश सूर्यापासून मिळतो ) हें (तत् ) पुढील वाक्यावरून (एतेन) लक्षांत आणावें (उपेक्षितव्यम्). तें वाक्य असें:—

**सुषुम्नः सूर्यरश्मिः चन्द्रमाः गधर्वः ( यजु० वाजसनेयिसंहिता १८।४० )**

सुषुम्न नांवाचा सूर्याचा किरण हाच चंद्रमा. हा एक गंधर्व आहे.

**इत्यपि निगमो भवति**

( सूर्यापासून चंद्राला प्रकाश मिळतो ) असा यजुर्मंत्र आहे. ( यजुर्मंत्रानें हेंच सिद्ध होतें.)

**सोऽपि गौः उच्यते**

ह्या सुषुम्न रश्मीलाहि गौः असें म्हटलें आहे.

**अत्राह गोरमन्वत ( ऋ. सं. १।८४।१५) इति**

**तत् उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

ह्या मंत्राची व्याख्या पुढें (निरुक्त ४।२५) देऊं.

**टीपः**—'तदेतेन०इत्यपि निगमो भवति' हें प्रक्षिप्त आहे. आदित्याचा एक किरण चंद्राकडे जाऊन त्याला प्रकाशित करतो, त्यालाहि गौः म्हटलें आहे असा सरळ संबंध आहे. मधील शब्दांची कांहीं जरूरी नाहीं. ती पुनरुक्ति होय. तिच्यापासून ज्यास्त अर्थ कांहीं निघत नाहीं. यास्क ऋग्वेदांतील उदाहरण ज्याअर्थी देतो त्याअर्थी इतर वेदांतील उदाहरणें देण्याचें त्याला कांहीं कारण नव्हतें. तो नेहमीं एकच उदाहरण देत असतो.

**सर्वे अपि रश्मयः गावः उच्यन्ते**

( सुषुम्नाला ' गौः ' म्हटलें आहे इतकेंच नव्हे तर ) सर्व किरणांनाहि 'गावः' असें म्हटलें आहे.

## खंड ७ वा

**ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः।**

**अत्राह तदुरुगायस्य वृष्णः परमं पदमव भाति भूरि ( ऋ. सं. १।१५४।६)**

**तानि वां वस्तूनि कामयामहे गमनाय यत्र गावः भूरिशृङ्गाः बहुशृङ्गाः**

ता = तानि = तीं. वाम् = तुम्हां दोघांचीं. वास्तूनि = घरें. उष्मसि=कामयामहे = आम्ही इच्छा करतों. गमध्यै = गमनाय = जाण्याकरितां. यत्र = जेथें. गावः = बैल. भूरिशृङ्गाः = बहुशृंगाः = पुष्कळ शिंगाचे.

**भूरि इति बहुनः नामधेयम्**

'बहु' ह्याचें 'भूरि' असें एक नांव आहे.

**प्रभवति इति सतः**

सतः ही षष्ठी आहे. जेव्हां 'बहु' हें प्रभवति म्हणजे अम्मल करते तेव्हां त्या क्रियेचें म्हणजे त्या क्रियेपासून 'भूरि' शब्द उत्पन्न होतो. 'भूरि' शब्द प्र+भू ह्याच्यापासून झाला आहे. कोणतीहि गोष्ट पुष्कळ असली म्हणजे तिचा अम्मल सर्वत्र चालतो. यास्क

'सतः सत्याः सताम्' अशीं षष्ठ्यंतरूपें शब्दांची व्युत्पत्ति दिल्यानंतर कोठेंकोठें वापरतो. जसें:— उषाः कस्मात्। उच्छतीति सत्याः ह्या व्युत्पत्तीचें विवरण करतांना दुर्ग म्हणतोः—विवासयति हि इयं तमांसि। तस्मात् उच्छति इत्येवम् अस्या एतस्मिन् कर्मणि सत्याः कर्तरि कारके उषाः इत्येतत् अभिधानं भवति (निरुक्त २।१८) = उषा अंधःकाराला घालवून देते म्हणून उच्छति = घालवून देते ही क्रिया जेव्हां ती करीत असते तेव्हां त्या क्रियेचें म्हणजे त्या क्रियेपासून उषाः हें रूप निघतें.

**शृङ्गं श्रयतेः वा**

शिंगाला शृंग म्हणण्याचें कारण तें डोक्याचा आश्रय करतें. शृंग शब्द 'श्रि' ह्या धातूपासून निघाला आहे.

**शृणातेर्वा शम्नातेर्वा**

किंवा शृ = हिंसा करणें अथवा शम् (तोच अर्थ) ह्यापासून निघाला असेल.

**शरणाय उद्गतम् इति वा**

शृङ्गम् = शृं + गम्. शृं = शरणाय. गम् = उद्गतम्. अथवा संरक्षण करण्याकरितां तें डोक्यांतून निघालें असतें. दुर्गाच्या वृत्तींत ही व्युत्पत्ति नाहीं.

**शिरसः निर्गतम् इति वा**

शृं = शिरसः. गम् + निर्गतम्. किंवा डोक्यापासून तें निघालें असतें म्हणून त्याला शृंग म्हणतात.

**अयासः अयनाः**

अयासः म्हणजे जाणारे, सर्वत्र संचार करणारे.

**तत्र तत् उरुगायस्य विष्णोः महागतेः**

अत्र = तत्र. अह हा पादपूरण निपात असल्यामुळें भाष्यांत गाळला आहे.

उरुगायस्य = महागतेः मोठी आहे गति ज्याची = वृष्णः = विष्णोः=विष्णूचें.

**परमं पदं परार्ध्यस्थम् अवभाति भूरि**

परमं = उंच जें स्थान ( परार्ध्य ) तेथें असणारें ( स्थम् ).

ह्या मंत्रांत यजमान व त्याची बायको ह्यांना मन्त्रद्रष्टा म्हणतोः— "हे दंपती ! तुम्ही तेथें जावें म्हणून तुमच्याकरितां आम्ही त्या घरांची ( वास्तूनि ) इच्छा करतों म्हणजे तुम्हांला उत्तम वसतिगृह मिळावें अशी आमची इच्छा आहे. त्या वसतिगृहांत ( यत्र ) लांबलांब पसरलेले ( भूरिशृङ्गाः ), सतत गमन करणारे ( अयासः ), किरण ( गावः ) आहेत. त्या ठिकाणीं महागति जो विष्णु त्याचें अतिशय उंच असें पद म्हणजे आदित्यमंडल अतीशय प्रकाशतें.

' जेथें देवांची संगति इच्छिणारे, उत्तम उत्तम अन्न म्हणजे अमृत पिऊन, आनंद पावतात तेथें तें विष्णूचें गोड अन्न खाण्याची मला फार उत्कट इच्छा आहे. उरुक्रम

जो विष्णु त्याच्या उत्तमस्थानीं अमृताचा मेघ आहे, असें हिच्या आधींच्या ऋचेंत म्हटलें आहे. प्रस्तुतच्या ऋचेंत ' वाम् ' हें कोणाला उद्देशून म्हटलें आहे तें समजत नाहीं. कोणी तरी दोन देवता ' वाम् ' शब्दांनीं उद्दिष्ट असाव्यात. त्या दोन देवता विष्णु व इंद्र असतील. ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें दिसतो.

"जेथें पुष्कळ किंवा लांब शिंगाच्या दुभत्या (अयासः ?) गाई आहेत अशा ठिकाणच्या घरांत राहण्याची आमची इच्छा आहे. त्याच ठिकाणीं उरुक्रम जो विष्णु त्याचें उच्च जें निवासस्थान तें अतिशय प्रकाशतें." ह्यावरून स्तोत्याची विष्णुलोकास जाण्याची इच्छा स्पष्ट दिसते. येथें विष्णूला वृषन् ( बैल ) असें गौरवानें म्हटलें आहे. वृषन्, गो, वगैरे विशेषणें गौरव दर्शवितात. कधीं कधीं ते शब्द केवळ शोभार्थ किंवा पादपूरण असतात.

**पादः पद्यतेः**

' पाद ' शब्द पद् = जाणें ह्यापासून निघाला आहे.

**तन्निधानात् पदम्**

जेथें पाय ठेवला जातो त्याला पद म्हणतात. तेव्हां पद शब्दहि पद् = जाणें ह्यापासून निघाला आहे.

**पशुपादप्रकृतिः प्रभागपादः**

पशोः पादाः । पशुपादाः । पशुपादाः प्रकृतिः यस्य सः प्रभागवाची पादः प्रभागपादः

कोणत्याही वस्तूचा चवथा जो भाग त्याला पाद म्हणतात. जनावराला चार पाय असतात. त्या प्रत्येकाला पाद म्हणतात. वस्तूच्या चौथ्या भागाला पाद म्हणण्याचें मूळ कारण ( प्रकृतिः ) जनावराच्या चार पायांपैकीं एक पाद होय. जनावराच्या पादापासून वस्तूच्या भागाला ' पाद ' म्हणण्याची चाल पडली आहे.

**प्रभागपादसामान्यात् इतराणि पदानि**

संहितेचीं पदें, वाक्यांतील पदें वगैरेंत पद शब्द घालण्याचें कारण तींहि संहितेचे व वाक्याचे भाग होत. ऋचेमध्यें ' पदं ' शब्द आला आहे. तो कसा उत्पन्न झाला ह्याची मीमांसा करावी लागली व त्यांतून एकदोन अनुमानें निघालीं. एका शब्दाचे अनेक अर्थ होण्याचें हेंच कारण. लक्षणेनें एका शब्दाचे अनेक अर्थ होतात. तथापि शब्दाची व्युत्पत्ति एकच. हें विधान निरुक्तसिद्धांताला विरुद्ध आहे.

**एवम् अन्येषाम् अपि सत्त्वानां संदेहाः विद्यन्ते**

जसे गो शब्दाचे अनेक अर्थ वर दाखविले व तद्विषयक संदेह दूर केला तसे ( एवम् ) इतर पृथिवीवाचक नामांविषयींहि ( सत्त्वानाम् ) संदेह उत्पन्न होतो. त्यांचा अर्थ काय व त्यांची अर्थाप्रमाणें कशी व्युत्पत्ति करावी असा प्रश्न उत्पन्न होतो.

**तानि चेत् समानकर्माणि समाननिर्वचनानि**

त्या पदांचा जर (चेत्) सारखाच (एकच) अर्थ होत असेल (समानकर्माणि) तर त्यांची व्युत्पत्ति एकच.

**नानाकर्माणि चेत् नानानिर्वचनानि**

परंतु त्यांचे जर भिन्न अर्थ होत असतील (नानाकर्माणि) तर त्यांची भिन्न व्युत्पत्ति केली पाहिजे (नानानिर्वचनानि).

**यथार्थं निर्वक्तव्यानि**

अर्थाप्रमाणें त्यांची व्युत्पति केलीच पाहिजे.

हा अर्थ वरील दोन वाक्यांत आलाच आहे. पुनरुक्तीची कांहीं जरूर नाहीं. म्हणून हे शब्द प्रक्षिप्त वाटतात.

**इति इमानि एकविंशतिः पृथिवीनामधेयानि अनुक्रान्तानि**

ह्याप्रमाणें पृथ्वीच्या एकवीस नावांचा अनुक्रमानें आम्हीं विचार केला.

नुसत्या गो शब्दाचा विचार केल्यानें 'सगळ्या एकवीस नांवाचा विचार केला असें कसें म्हणतां येईल ?

**तत्र निर्ऋतिः**

त्या एकवीस नामांमध्यें 'निर्ऋति' हा शब्द आहे.

**निरमणात्**

पृथ्वीला निर्ऋति म्हणण्याचें कारण तिच्यावर राहणारें सर्व प्राणी अत्यंत सुख भोगतात. निः = नि. ऋतिः – रमणम्. ऋति हा 'रम्' धातूला 'ति' प्रत्यय लावून व र्चें संप्रसारण करून झाला आहे. हें शब्दरूप साधतांना रम्मधील 'अम्'चा लोप झाला हें सांगावयास नको.

**ऋच्छतेः कृच्छ्रापत्तिः इतरा**

कृच्छ्रापत्तिः अर्थः यस्याः सा इतरा निर्ऋतिः ऋधातोः

परंतु वाईट स्थिति (कृच्छ्रापत्तिः) असा जेव्हां निर्ऋति शब्दाचा अर्थ होतो तेव्हां तो शब्द निः + ऋ ह्यापासून होतो. निः (= अतिशय) + ऋ (= जाणें) = संकटांत पडणें. अत्यंत वाईट अवस्था ती निर्ऋति.

**सा पृथिव्या संदिह्यते । तयोः विभागः**

निर्ऋतीचे अर्थ कृच्छ्रापत्ति व पृथिवी ह्यांपैकीं अमक्या एका ऋचेंत कोणता अर्थ असा संदेह उत्पन्न होतो. त्या दोन अर्थांची विभागणी केली पाहिजे. म्हणजे कोणता अर्थ कोठें लागू पडतो हें स्पष्ट सांगितलें पाहिजे.

**तस्याः एषा भवति**

ज्यांत निर्ऋति शब्द तत्संबंधीं पुढील ऋचा होय. तींत निर्ऋति शब्दाचे दोन्हीहि अर्थ आले आहेत.

अनुक्रमणिका

खण्ड ८ वा.

**य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात् ।**
**स मातुर्योना परिवीतो अन्तर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश (ऋ. १।१६४।३२)**

**बहुप्रजाः कृच्छ्रम् आपद्यते इति परिव्राजकाः**

ज्याला पुष्कळ संतति होते तो संकटांत पडतो असा परिव्राजक म्हणजे संन्यस्त ( संसार ज्यांनीं टाकून दिला आहे असे) ह्या ऋचेचा अर्थ करतात.

**वर्षकर्म इति नैरुक्ताः**

परंतु ह्या ऋचेंत पाऊस कसा पडतो किंवा पाऊस पडणें एवढाच अर्थ आहे असें नैरुक्त म्हणतात.

**य ईं चकार इति करोतिकिरती संदिग्धौ वर्षकर्मणा**

'चकार' हें कृ = करणें व कॄ = शिंपडणें ह्या दोहोंचेंहि रूप होतें. तेव्हां दोहोंपैकीं येथें कोणता अर्थ हा संशय उत्पन्न होतो. कोणताहि अर्थ असला तरी तो वर्षकृतीला लागू पडतो, 'पाऊस तयार केला' व 'पावसाचें सिंचन केलें' असे दोन्हीहि अर्थ चकार ह्यांतून निघतील. 'य ईं चकार' याचा 'ज्यानें ह्याला (ईम्) म्हणजे वर्षावाला केलें हा किंवा त्याचें सिंचन केलें' हा अर्थ.

**न सः अस्य वेद मध्यमः**

मध्यम जो मेघ तो वर्षाव म्हणजे काय हें जाणत नाहीं.

**सः एव अस्य वेद मध्यमः यः ददर्श आदित्योपहितम्**

आदित्यानें म्हणजे सूर्यकिरणांनीं हा मेघ तयार केला आहे असें जो पाहतो तो मध्यमच इंद्र हा वर्षाव काय आहे हें जाणतो. इंद्राला पावसाची कृति किंवा शास्त्र कळतें, मेघाला कळत नाहीं.

**स मातुः योनौ माता अन्तरिक्षम्**

येथें माता म्हणजे अंतरिक्ष. अंतरिक्षाला माता म्हणण्याचें कारण

**निर्मीयन्ते अस्मिन् भूतानि**

सर्व प्राणी येथें निर्माण होतात. पाणी हें जीवनाचें कारण. तें पाणी अंतरि-क्षांत निर्माण होतें. तेव्हां सर्व जीव येथेंच उत्पन्न होतात म्हणून अंतरिक्षाला माता म्हणजे निर्माता असें म्हटलें आहे.

**योनिः अन्तरिक्षम्**

योनि म्हणजे अंतरिक्ष. कारण

**महान् अवयवः**

अंतरिक्ष हा ब्रह्मांडाचा मोठा भाग आहे. म्हणजे अंतरिक्षवाची योनि शब्द अव + यु ह्यापासून झाला आहे. यु = जोडणें. अव + यु = तुकडा पाडणें. अंतरिक्ष हा ब्रह्मांडाचा मोठा तुकडा आहे.

परिवीतः वायुना

परिवीतः = परिवीतः वायुना = ज्याच्याभोंवतीं वारा गेला आहे.

वाऱ्यामुळें मेघ इकडे तिकडे हालचाल करतो.

परिवीतः = परि+वि+इतः = ज्याच्याभोंवतीं गेला आहे असा.

अयमपि इतरः योनिः एतस्मात् एव

हा जो दुसरा म्हणजे लौकिक भाषेंतला 'योनि' शब्द तोहि 'यु' धातूपासून झाला आहे. कारण

परियुतो भवति

त्याच्या भोंवतीहि स्नायु आणि मांस असतें. दुर्गाच्या पठांत 'भवति' याच्यानंतर ' स्नाव्ना मांसेन च' हे शब्द होते असें दिसतें व तसे शब्द असणें जरूर आहे.

बहुप्रजाः भूमिम् आपद्यते वर्षकर्मणा

निर्ऋतिम् = भूमिम्. आविवेश=आपद्यते. बहुप्रजाः=बहुशः प्रजायमानः (दुर्ग).

मेघ पावसाच्या रूपानें जन्म घेऊन पृथ्वीकडे जातो.

ह्या पाठांत ऋचेचा फक्त वर्षपर अर्थ दिला आहे. तो असाः—मेघ वर्षाव करतो किंवा पाऊस पाडतो. पण पाऊस कसा उत्पन्न होतो हें त्याला माहीत नसतें. परंतु अंतरिक्षामध्यें पाण्याची वाफ झालेली जो पाहतो त्याला ही कृति कळते. वायु ज्याच्याभोंवतीं आहे असा आकाशाच्या एका भागांत असणारा मेघ जोरानें पावसाचा जन्म घेऊन भूमींत शिरतो.

परिव्राजकांचा अर्थ दुर्गानें आधीं दिला आहे. तेव्हां दुर्गाच्या पाठांत त्या प्रकारचें यास्कभाष्य असावें. परिव्राजकांचा अर्थ असाः—जो गर्भ करतो म्हणजे गर्भाचें आधान करतो त्याला गर्भाचें स्वरूप कळत नाहीं. पण जो तें तत्त्व पाहतो तो त्याच्यापासून अलिप्त राहतो म्हणजे प्रजोत्पादनाच्या कामांत तो पडत नाहीं. प्रजोत्पादनकर्ता आईच्या योनींत गुरफटला जाऊन पुनः पुनः जन्म घेतो व त्यामुळें संकटांत पडतो. दुर्गानें केलेला अर्थ जरा भिन्न आहे. तो असाः—

शरीरामध्यें गर्भ कसा लपलेला असतो (हिरुक्) हें जो बरोबर पाहतो त्यालाच हें प्रजोत्पादन म्हणजे काय आहे हें कळतें. परिवीतः = जरायूनें वेष्टित असा. मातुर्योनौ = गर्भाशयाचें ठिकाणीं. बहुप्रजाः = ज्याला फार मुलें झालीं आहेत असा.

शाकपूणिः संकल्पयांचक्रे सर्वाः देवताः जानामि इति

मला सगळ्या देवता माहीत आहेत असा अभिमानयुक्त विचार शाकपूणीच्या मनांत आला. तेव्हां

तस्मै देवता उभयलिङ्गा प्रादुर्बभूव

त्याच्या समोर जिच्यामध्यें पुरुषाचीं व स्त्रीचीं दोन्हीहि चिन्हें होतीं अशी देवता प्रकट झाली.

**तां न जज्ञे**

ती त्याला ओळखतां आली नाहीं.

**तां पप्रच्छ विविदिषाणि त्वा इति**

तुला जाणण्याची मला इच्छा आहे; (तेव्हां तूं कोण आहेस असें) त्यानें तिला विचारलें.

**सा अस्मै एताम् ऋचम् आदिदेश । एषा मद्देवता इति**

अहं देवता यस्यां सा मद्देवता

ह्या ऋचेंत मी देवता आहें असें म्हणून पुढील ऋचा ती त्याला सांगती झाली.

हें पुढील खंडाचें निदान होय. पुढील खंडाचा निर्ऋति शब्दाशीं किंवा पृथिवी-वाचक कोणत्याहि शब्दांशीं संबंध नाहीं.

## खंड ९ वा

**अयं स शिङ्क्ते येन गौरभीवृता मिमाति मायुं ध्वसनावधि श्रिता ।**
**सा चित्तिभिर्नि हि चकार मर्त्यं विद्युद्भवन्ती प्रति वव्रिमौहत**

(ऋ. १।१६४।२९)

**अयं सः शब्दायते**

शिङ्क्ते = शब्दायते.

तो हा गडगडाट करीत आहे.

**येन गौः अभिप्रवृत्ता**

अभीवृता = अभिप्रवृत्ता.

जिला गति दिलेली आहे अशी. दुर्गाच्या पाठांत अभिप्रवृत्ता शब्दाच्या ऐवजीं अभीवृता असाच पाठ आहे.

**मिमाति मायुं शब्दं करोति**

मिमाति मायुं = शब्दं करोति = हंबरडा फोडते.

**मायुमिव आदित्यम् इति वा**

किंवा मायु म्हणजे आदित्य. आदित्य जसा प्रकाशमान असतो तशी ती स्वतःला प्रकाशमान करते. आदित्याला मायु म्हणण्याचें कारण तो सर्वभूतनिर्माता आहे. मायु शब्द निर् + मा ह्यापासून झाला आहे. वास्तविक पहातां मा किंवा मी = शब्द करणें हाच धातु मायु शब्दांत आहे.

**वाक् एषा माध्यमिका**

येथें गौ म्हणजे माध्यमिका वाक् म्हणजे अंतरिक्षांत होणारा आवाज.

**ध्वंसने मेघे अधिश्रिता**

ध्वसनौ = ध्वंसने मेघे = जो तिचा ध्वंस करावयाला बघतो अशा मेघांत.

अधिश्रिता = त्याच्यावर अवलंबून असणारी म्हणजे त्याच्यांत गुरफटलेली.

## परिषदेची हानी

सुप्रसिद्ध ग्रंथकार व वाग्वीर शिवराम महादेव परांजपे यांस अविधवानवमीच्या दिवशीं (ता. २७ सप्टेंबर) सकाळीं देवाज्ञा झाली हें ऐकून परिषदेच्या सभासदांस अत्यंत दुःख होईल यांत शंका नाहीं. विनंति करतांच वर्गणी पाठवून शिवरामपंत परिषदेचे सभासद झाले. पण त्यावेळीं इतक्या लवकर परिषदेला ते सोडतील अशी कल्पनाहि कोणास करतां येण्यासारखी नव्हती. शिवरामपंतांनीं मराठी भाषेची सेवा नानाविध मार्गांनीं केली आहे. गोष्टी, नाटकें, इतिहास, तर्कशास्त्र, अलंकार, मीमांसा वगैरे अनेक विषयांवर त्यांनीं विद्वन्मान्य ग्रंथ लिहिले आहेत. आपल्या ग्रंथांनीं शिवराम-पंतांनीं एक विशिष्ट लेखनशैली प्रचारांत आणल्यामुळें मराठी भाषाक्षेत्रांत त्यांचें स्थान अढळ झालें आहे. मराठी भाषेची सेवा त्यांनीं आमरण केली. शिवरामपंत रसिक होते तसेच चिकित्सक होते. प्रकृति क्षीण झाली असतांहि वेळगांवच्या साहित्य-संमे-लनाकरतां एक विस्तृत लेखी भाषण शिवरामपंतांना सहज तयार करतां आलें यावरून त्यांच्या वाङ्मयविषयक जागरूकतेची चांगलीच साक्ष पटते.

---

### नवीन तहाहयात सभासद

१ श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि
२ श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद

१ ५० रुपये देऊन महाराष्ट्रसाहित्यपरिषदेचे तहाहयात सभासद होतां येतें.

२ म. सा. परिषदेच्या सभासदत्वाची वर्गणी रुपये ३.

३ सभासदांना महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेकरतां निराळी वर्गणी द्यावी लागत नाहीं. फक्त टपाल-खर्च ८ आणे दिला म्हणजे झालें.

---

## जमाखर्च

ना. गो. चापेकर यांच्याकडे झालेल्या वसुलीचा व खर्चाचा हिशेब.

| | जमा | | खर्च | |
|---|---|---|---|---|
| जुलै- | १७८ रु. | वर्गणी. | ३३-. ८- ६ रु. | टपालखर्च |
| आगष्ट- | २२९ ,, | ,, | ९-१४- ० ,, | ,, |
| सप्टेंबर- | २१३ ,, | ,, | ६- १- ० ,, | ,, |
| एकूण | ६२० | | एकूण ४९- ७- ६ | |

टीप:- वर्गणींत गेल्या सालच्या अंकांच्या विक्रीची रक्कम आहे. वसूल झालेली सर्व रकम (६२० रु.) महिन्याच्या महिन्यास खजीनदार श्री. सुंदरराव वैद्य यांच्याकडे जमा करण्यांत आली आहे. दुसऱ्या अंकाचा खर्च २७४-४-० खजीनदारांकडून आर्यसंस्कृतिमुद्रणालयास मिळाला आहे.

मुंबईच्या कचेरींत आलेला वसूल व झालेला खर्च.

| | जमा | | खर्च | |
|---|---|---|---|---|
| जुलै— | १०-८-० | वर्गणी | १-४-६ | ट. ख. |
| | ०-२-० | व्ही. पी. चा आलेला खर्च | २-१-० | रेलवे हाशील अंकांचें |
| आगष्ट— | ७-८-० | वर्गणी | ०-६-० | हमाली |
| सप्टेंबर— | ७-०-० | ,, | | |
| | १-०-० | अंक विक्री | ०-४-० | ट. खर्च |
| एकूण | २६-२-० | | ३-१५-६ | |

---

पुणें येथें आर्यसंस्कृति-मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरोड येथें **वासुदेव गोपाळ परांजपे** यांनीं छापिलें व मुंबई येथें महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत (भाई जीवनजीची गल्ली, मुंबई नं. २) परिषदेकरितां रा. **ना. गो. चापेकर** यांनीं प्रसिद्ध केलें.